


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली



साहित्य • कला • संस्कृति

वर्ष १६ वें : जानेवारी ६१

## श्रेयनामावलि



टेलिफोन
७७७६५

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल**. दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ 








पौष शके १८८२ जानेवारी १९६१

# तव स्मरण संतत स्फुरण आम्हां घडो

भारतीय इतिहासांत जानेवारी महिना अनेक दृष्टीनें संस्मरणीय मानावा लागेल. कारण या महिन्यांच्या २६ तारखेस १९३० सालीं पं. नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या भारतीय कॉंग्रेसनें संपूर्ण स्वातंत्र्याचें आपलें ध्येय जाहीर केलें. आणि त्यादिवसापासून २६ जानेवारी हा आपला स्वातंत्र्यदिन आणि स्वतंत्र भारतांत प्रजासत्ताक दिन म्हणून मान्यता पावलेला आहे.

स्वातंत्र्य येऊन आतां तेरा वर्षें झालीं आणि या एका तपाच्या कालावधींत आमच्या देशानें काय प्रगति केली याचा आढावा घेतला तर आपण असें निश्चितपणें म्हणूं शकूं कीं आपण फारच अभिनंदनीय प्रगति केली आहे. या काळांत आपण दोन पंचवार्षिक योजना पूर्ण केल्या आणि तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचा आराखडा आंखीत आहोंत. या योजनांमुळें देशांतील उद्योगधंदे, धरणें यांची वाढ झाली. आणि आपण आपल्या राहाणीचें मान वाढविण्याचा यशस्वी प्रयत्न केला. वास्तविक पाहतां गेल्या दोन वर्षांत चीनचें आपल्या सरहद्दीवरील आक्रमण, देशांतील कांहीं राज्यांतील कॉंग्रेस संघटनांत सत्तेसाठीं चाललेली स्पर्धा, गोव्याचें भिजत पडलेलें घोंगडें, नागा प्रदेश आणि पंजाबी सुभा यांच्या निर्मितीसाठीं चाललेला संघर्ष आणि नुकतेंच 'बेरूबारी' प्रकरणांत निर्माण झालेलें वादळ या कांहीं थोड्या बहुत कटु घटना सोडल्यास आपण अल्पावधींत फारच मोठें यश मिळविलें आहे हें निर्विवाद.

परंतु या यशांत समाधान मानून राहाण्यासारखी परिस्थिति अजून निर्माण झालेली नाहीं. दिवसेंदिवस महागाईचा प्रश्न विकट स्वरूप धारण करूं लागला आहे. या ओझ्याखालीं देशांतील मध्यमवर्ग चिरडून जातो कीं काय अशी भीति निर्माण झालेली आहे. आणि या सर्व संकटांना आणि परचक्रापासून आपलें रक्षण करण्यासाठीं देशांतील जनतेनें एकजूटीनें आपलें नैतिक सामर्थ्य पणाला लावून या प्रश्नांना खंबीरपणें तोंड दिलें पाहिजे.

यंदाच्या प्रजासत्ताक दिनाला महाराष्ट्र राज्याच्या दृष्टीनें तर विशेष महत्त्व आहे. कारण फारां दिवसांची आपली मनीषा पूर्ण झाली आहे. आणि नवा औद्योगिक महाराष्ट्र देशाच्या जीवनांत अग्रभागीं चमकण्यासाठीं आपण अहोरात्र आपलें सर्वस्व पणाला लावलें पाहिजे हाच या प्रजासत्ताक दिनाचा खरा अर्थ. • • •

# गोस्वामी तुलसीदास

गोस्वामी तुलसीदासांच्या ग्रंथांतून त्यांच्या जीवनासंबंधीं कांहींहि विस्तृत माहिती मिळत नाहीं. श्रीरामाच्या ठिकाणींची त्यांची भक्तिजन्य लीनता मात्र ठायीं ठायीं प्रचंड लाटेसारखी उफाळून येते व फेसाळून पसरते. गोस्वामीजींना वाल्मिकीचा अवतार मानतात. त्यांचा जन्म विक्रमसंवत १५५४ श्रावण शुद्ध सप्तमी या दिवशीं एका ब्राह्मण-कटुंबांत झाला.

"पंदरह सै चउवन बिपै, कालिंदीके तीर।
श्रावण शुक्ल सप्तमी, तुलसी धरेउ शरीर ॥" असा एक उल्लेख आहे त्यांच्या वडिलांचें नांव आत्माराम दुबे व मातेचें हुलसी. मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या या बालकाचे बत्तीसहि दांत ज्यावेळीं सुइणीनें पाहिले, त्यावेळीं तिनें एकच आकांत केला. शेजारीपाजारी जमले. त्यांतील जे अधिक जाणिते होते त्यांनीं निर्णय दिला, 'अशा या कुलक्षणी सर्वनाशी बालकाला घरांत ठेवण्यापेक्षां त्याची वेळींच हत्या केलेली बरी;' परंतु आईवडिलांनी लोकांच्या या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलें व मध्यरात्रींच्या सुमारास गांवाबाहेरील एका मोलकरणीच्या ओटींत या बालकाला घालून तिला त्याचें रक्षण करण्याची विनंति केली. पुढें योग्य वेळीं त्याला घरीं आणून त्यांनीं त्याचें संगोपन केलें.

वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी तुलसीदासांचें लग्न झालें. त्यांच्या पत्नीचें नांव होतें बुद्धिमती. ती अतिशय देखणी होती. लग्नानंतर तुलसीदास इतका विषयासक्त झाला, कीं त्याला दुसरें कांहीं दिसेचना! तो धर्म कर्म सर्व कांहीं विसरला. कांहीं कारणासाठीं बुद्धिमती देवीला एकदां माहेरीं जावें लागलें. तुलसीदास बेचैनी झाला. रात्र होतां

(पान ६ वर चालू)



श्री तुलसीदास

ऐसी मूढ़ता या मनकी ।
परिहरि राम-भगति-सुरसरिता, आस करत ओस कनकी ॥ १ ॥
धूम-समूह निरखि चातक ज्यों, तृषित जानि मति घनकी ।
नहीं तहँ सीतलता न बारि, पुनि हानि होति लोचनकी ॥ २ ॥
ज्यों गच-काँच बिलोकिसेन जड़ छाँह अपने तनकी ।
टूटत अति आतुर अहार बस, छति बिसरि आननकी ॥ ३ ॥
कहँ लौं कहौं कुचाल कृपानिधि ! जानत हौ गति जनकी ।
तुलसिदास प्रभु हरहु दुसह दुख, करहु लाज निज पनकी ॥ ४ ॥

—श्री तुलसीदास





अनुक्रमणिका

होतां त्याची बेचैनीं इतकी वाढली, कीं मागचा पुढचा विचार न करतां एकदम उठून तो सासुरवाडीला जायला निघाला. त्याच्या विषयवासनेची तीव्रता दाखवण्याकरितां कांहीं चरित्रकारांनी 'तो नदीकाठीं वाहून आलेल्या एका माणसाच्या मुडद्यावर बसून पलीकडे गेला. व लोंबकळणाऱ्या एका सापाला, दोर समजून त्यावरून चढून खिडकीवाटे माडीवरच्या खोलींत घुसला.' असेंहि लिहून ठेवलेलें आहे. त्याची ती कामांधता पाहून बुद्धिमती फार कष्टी झाली. तिनें त्याला उपदेश केला.

"हाड-मांसको देह मम, तापर जितनी प्रीति।
तिसु आधी जो रामप्रति, अवसि मिटिहि भवभीति ॥

पत्नीनें केलेल्या या उपदेशाचा तुलसीदासाच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. तो उपदेश त्याला मानहानीचा वाटला. त्याचक्षणीं तो तिथून निघाला, व विषण्ण मनस्थितींत वाट दिसेल तसा भरकटत राहिल्या. रात्रंदिवस चालत चालत अखेर तो प्रयाग क्षेत्रीं पोंहोचला. इथें त्याला विरक्ति प्राप्त झाली. कांहीं दिवसांनीं त्याच्या मनानें तिर्थाटनाचा ध्यास घेतला. आणि काशीपासून रामेश्वरपर्यंत त्यांनीं पायीं तिर्थाटन केलें. या तिर्थाटनाला एकंदर चौदा वर्षे लागलीं. श्री नरहरिदासांकडून दीक्षा घेऊन त्यांना तुलसीदासांनीं परात्पर गुरु मानलें व त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करीत ते साधना करूं लागले.

गोस्वामीजींच्या जवळ एक मोठा लोटा होता. गंगेचे पाणी त्या लोट्यांत भरून घेऊन प्रातर्विधीसाठीं ते गगापार जात असत व परततांना राहिलेलें पाणी एका झाडाखालीं ओतून टाकीत. असा नित्यक्रम चालला होता. त्या झाडावर एक पिशाच राहात होतें. स्वामींनीं ओतून टाकलेल्या त्या पाण्यानें अभावितपणें त्याची तृषा शांत होत होती. तृप्त झालेलें तें पिशाच एके सकाळीं स्वामींसमोर प्रगट होऊन, वर मागायला सांगूं लागलें. गोस्वामी चलित झाले नाहींत. त्यांनीं त्या पिशाच्च्याजवळ श्रीरामदर्शनाची इच्छा प्रगट केली. त्यावर पिशाच्च्यानें असा संकेत सांगितला, कीं "पलीकडे असलेल्या एका मंदिरांत नित्य सायंकाळीं रामायणाची कथा चालते. तिथें म्हाताऱ्याच्या रूपानें प्रत्यक्ष हनुमान—सर्वांच्या आधीं येतात व सर्वांच्या अखेरीला निघून जातात. त्यांना विनंति करा. तुम्हाला दर्शन होईल!"

त्याच दिवशीं तुलसीदास त्या मंदिरांत जाऊन पिशाच्च्यानें सांगितलेल्या खुणेकडे लक्ष देत बसले. रामकथा संपली सर्वलोक निघून गेले. अगदीं शेवटीं एक म्हातारा काठी टेकीत टेकीत मंदिरा-बाहेर चालला होता. तुलसीदासानीं धांवत जाऊन त्याचे पाय धरले व स्फुंद-स्फुंदून रडूं लागले. म्हाताऱ्यानें पुष्कळ समजावलें; पण तुलसीदास ऐकेचनात शेवटीं म्हाताऱ्यानें विचारलें, 'काय इच्छा आहे?'

'श्री रामाचें दर्शन द्या!' तुलसीदास म्हणाले.

'चित्रकुट पर्वतावर जा, तिथें दर्शन होईल!' इतकें बोलून मारुतिराय अंतर्धान पावले.

मारुतिरायाच्या आदेशानुसार गोस्वामी चित्रकुटपर्वतावर आले. कित्येक दिवस झाले पण दर्शन होईना. एक दिवस दाट झाडींत फिरतां फिरतां दोन राजकुमार हातांत धनुष्यबाण घेऊन घोड्यांवरून दौडत जात असलेले दिसले. त्यांतला एक श्यामल व दुसरा गौरवर्णीय होता. स्वामीजींच्या समोरून ते गेले. पण स्वामीजींना बोध झाला नाहीं. त्याचक्षणीं मारुतिरायांनीं प्रगट होऊन विचारलें,

(पान ५८ वर चालू)



अनुक्रमणिका







# जीवन सौंदर्याचे प्रेषित

# र विं द्र ना थ



बा. भ. बोरकर

❀

*

*

( कविन्द्र रविन्द्रांची जन्मशताब्दि १९६१ च्या आरंभींच मुंबई येथें साजरी होत आहे. त्या निमित्त समारंभाच्या साहित्य विभागाचे नियोजित अध्यक्ष श्री. बा. भ. बोरकर यांच्या भाषणांतील कांहीं भाग येथें देत आहोंत. )

एखाद्या राष्ट्रानें हजारों वर्षे साधना करावी तेव्हां कुठें त्याचीं स्वप्नें आणि आकांक्षा, व्यथा आणि वेदना, स्मृति आणि संकल्प, वृत्ति आणि आदर्श साकार करून त्याला जागृत करणारा महाकवि निर्माण होतो. असल्या महाकवीच्या वाणीनं त्याला जन्म देणारा देश पुनरुज्जीवित होतो. आपल्या अटळ नियतीचें त्याला भान होतें आणि आपल्या विकासाची वाट चालण्याचें त्याला त्राण येतें. अशा महाकवींची महान् परंपरा आपल्या या महान् देशांत वेदकालापासून चालत आली आहे. असले महाकवीच आपल्या देशाचे खरे शककर्ते होत. आपल्या देशाचीं युगें मोजायचीं झालीं तर तीं त्यांच्याच नांवानें मोजावीं लागतील. गुरुदेव ठाकूरांपर्यंत या देशांत खऱ्या अर्थानें शक चालू होता तो कविकुलगुरु कालिदासाचा. पण त्यानंतर शक चालू झाला तो गुरुदेवांचा. पंडितजींपासून आजच्या तरुणापर्यंत या देशांत प्रत्येक जागृत मनावर त्यांचीच आदर्शमुद्रा उमटली आहे. कालीदास हा आपला पहिला सौन्दर्य प्रेषित. त्याच्या काव्यांत आपण भारतवर्षाच्या सुवर्णयुगाचा उपसंहार पाहिला. रविंद्रनाथांच्या निर्मितींत आपण आपल्या नव्या सुवर्णयुगाचा उपोद्घात पहात आहोंत. ज्यावेळीं देशानें उत्कर्षाचा परमोच्च बिंदू गांठलेला असतो त्यावेळीं त्यांच्या आत्मिक आणि लौकिक ऐश्वर्याचें उद्गामन करणें एका दृष्टीनें सोपे असतें. पण जेव्हां तो पारतंत्र्यांत पिचलेला असतो, श्रद्धांनीं खचलेला असतो, आकांक्षांनीं खुरटलेला असतो, दैन्यानें गांजलेला असतो, आणि नाना प्रकारच्या द्वैतांनीं आणि नाना भेदांनीं खिळखिळा झालेला असतो तेव्हां त्याच्या अमर पिंडाचें आणि अटळ नियतीचें अचूक दर्शन घेऊन त्याच्या श्रद्धा सबल करणें आणि त्याला उत्साहानें जीवनप्रवण करणें कठिण असतें. त्यासाठीं फारच मोठ्या तोलामोलाची प्रतिभा लागते. राष्ट्राच्या हजारों वर्षांच्या साधनेनेंच एखाद्या भाग्यवंताला ती प्राप्ति व्हायची. गुरुदेव रविंद्रनाथ हे एक असेच लोकोत्तर भाग्यवंत होते.

रविंद्रनाथांचें एकंदर जीवन आणि कर्तृत्व यांची आपली तोंडओळख जरी आपण करून घेतली तरी कालीदास आपल्या खंडित साधनेची सांगता करण्यासाठीं 'शुचीनां श्रीमतां गेहे' जन्माला आला असावा असें वाटते.

संस्कारसंशुद्ध आणि संस्कारसमृद्ध अशा महर्षि देवेंद्रनाथांच्या पोटीं रविंद्रनाथ जन्माला आले. संस्कारसुलभ बालवयांतच कला, साहित्य, आणि तत्त्वज्ञान ऋद्धिसिद्धि होऊन आपल्या घरीं पाणी भरीत असल्याचें दृश्य त्यांना पहायला मिळालें. त्यांच्याच जोडीस पाश्चात्य संस्कृति आपलीं अभिनव वरदानें घेऊन त्यांच्या स्वागताला सुसज्ज होती. लहानपणांतच ते पोरके झाले पण सृष्टिमातेच्या मांडीवर ते आपला पोरकेपणा विसरू शकले, आणि धर्मात्मा असलेल्या पित्याच्या सहवासांत हिमालयाच्या उत्तुंग सौंदर्याचें आकंठ पान त्यांना करतां आलें. अबोल बालरविंद्राच्या कोमल अंतःकरणांत हें सारें ऐश्वर्य जमत राहिलें आणि चिंतन मननानें अर्थघन होऊन तें व्यक्त होण्या-



अनुक्रमणिका

साठीं धडपडूं लागलें. पृथ्वीच्या पोटांत कित्येक दिवसमास मुरलेलें पाणी सांचत सांचत शेवटीं बाहेर फुटण्यासाठीं अनावर व्हावें तशी त्यांची अवस्था झाली. या अवस्थेचें बहारदार चित्रण त्यांनीं आपल्या 'निर्झरेर स्वप्नभंग' या कवितेंत् केलें आहे. हा झरा फुटला तेव्हांच त्यांना आपल्या नियतीचा खराखुरा साक्षात्कार झाला; ज्या महासागरांत शेवटीं जाऊन मिळावयाचें आहे त्याची हांक ऐकूं आली आणि आपल्या प्राणाच्या गर्तीतूनच त्यांना आपला मार्ग सांपडला. या कवितेंत आपल्या त्यावेळच्या स्थितीचें वर्णन करतांना ते म्हणतात, 'माझ्या प्राणा, पहातोस काय ? याचक्षणीं हें बंधन तोडून टाक आणि हा मुक्तीचा क्षण साधून घे. असला हा भाग्याचा क्षण क्वचितच येतो. ज्याक्षणीं प्राण असा उन्मत्त होऊन उठतो त्याक्षणीं कसला अंधार आणि कसला पाषाण ! ते किती वेळ टिकाव धरतील ? चल आपणहि करुणेचा धारा अशीच टाळीत राहूं आणि ही पाषाणाची कारा मोडून टाकूं !' अशा या आवेगांत आपल्या आंतरिक ऐश्वर्याची जाग येते आणि ते म्हणतात : माझ्या प्राणांत, अहाहा ! किती कथा आणि किती गीतें. किती प्राण आणि किती सुखें; किती इच्छा आणि किती आकांक्षा आकंठ दाटून राहिल्या आहेत ?'

हें जें सर्व ऐश्वर्य त्यांना आपल्यांत जाणवलें तें भारतवर्षाचें सुकृत आहे. पण त्यांच्या व्यक्तित्वमंथनांत अधिक संशुद्ध आणि अधिक सुरुचिर झालेलें आहे. या असल्या अद्भुत अनुभवानें रविंद्रनाथांचें अल्पवयांतच उन्नयन झालें. अंतर्यामीच्या सनातन पुरुषानें अशा रीतीनें त्यांना आपल्या चराचर सृष्टींतलें चैतन्य जागें करणाऱ्या प्रकाशाच्या दिव्य आचमनानें, त्यांना ही काव्यदीक्षा प्राप्त झाली. त्या दीक्षेनें त्यांच्या प्राणाला पंख फुटले आणि गतीचा संचार होऊन ते मंत्रघोष करूं लागले. आपण बिंदुमात्र असलों तरी महासागराचें ऐश्वर्य आपल्यांत सामावलें आहे याचा त्यांना साक्षात्कार झाला. शेकडों कथा, हजारों गीते, असंख्य प्राण आणि अगणित सुखें सफल होण्यासाठीं आपल्या स्पर्शाची वाट पहात असल्याची त्यांना जाणीव झाली. या अपरंपार ऐश्वर्याच्या अयाचित दर्शनानें ते विस्मयचकित झाले, रोमांचित झाले आणि विलक्षण तरल होऊन सर्व संचार करूं लागले. आनंद, उद्दाम आनंद, अपार आनंद, शाश्वत आनंद हेंच या विश्वाचें मर्मस्थान आणि परम निर्वाण आहे याविषयीं त्यांची खात्री झाली आणि आपल्या निर्मितीचीच साधना करून ते जीवनाची आनंद यात्रा चालूं लागले. पुढें याच निर्झराची पुण्यपावन जान्हवी होऊन ती विशाल सागरास भेटली आहे. आणि तरीहि आनंदाचे उमाळे अनुभवण्यासाठीं या सागरभेटीनंतर देखील तिनें आपला निराळेपणा टिकवला आहे.

रविन्द्रनाथांचें साहित्य, चित्र, संगीत, नाट्य, तत्त्वचिंतन, सामाजिक राजकीय टीका यांतलें कांहींहि पहा त्यांचे शिवाचे भाव सहसा सुटत नाहींत. त्याच्या दिव्यतेचें चांदणें त्यांच्या साऱ्या मानवविश्वावर सोडलेलें दिसतें. त्यांच्या व्यथेच्या, विषादाच्या, खिन्नतेच्या आणि अथांग उदासतेच्या छायादेखील त्या चांदण्यांत अपार सौन्दर्य धारण करतात आणि त्या लावण्यचंद्राची ओढ लावतात. सदैव रविंद्रनाथांच्या सांगाती असलेला हा शिव कधीं उपद्रष्टा, कधीं अनुमन्ता, कधीं भर्ता, कधीं भोक्ता तर कधीं महेश्वर अशा पंचविध स्वरूपांत त्यांच्या जिवाला आपल्या दिव्य स्पर्शाचे नवनवीन रोमांचकारी उमाळे आणीत असतो. ज्ञानदेव कलावंताचा 'परतत्त्व स्पर्शू' म्हणतात तो हाच. रविंद्रनाथांच्या यच्चयावत् निर्मितींत तो नेहमीं जागता आहे आणि त्याचमुळें त्यांनीं वर्णिलेली सृष्टि लौकिक आणि परिचित वाटली तरी तिच्या दर्शनानं अलैकिकाचा स्पर्श जाणल्याशिवाय रहांत नाहीं.

आपल्या भोंवतालीं पारतंत्र्य, अज्ञान, दारिद्र्य, दैन्य, शोषण आणि दुःख यांचें अफाट रान माजलेलें असतांना त्यांची जीवनानंदावरची श्रद्धा क्षणभरदेखील विचल झाली नाहीं. राष्ट्राचे आणि मानवाचे आदर्श उंचावण्यासाठीं आणि विश्वभोग्य करण्यासाठीं त्यांनीं आपल्या जीवनाच्या ध्वजदंडावर आपल्या वाणीचा ध्वज केला. त्याच्यावर आपल्या राष्ट्राचीं आणि उद्यांच्या जगाचीं स्वप्नें चितारलीं आणि विश्वशांतीचें परमचक्र फिरतें ठेवलें. जीवनांतील एका प्राणशक्तीपुढें बाकी सर्व शक्ति कःपदार्थ आहेत याविषयीं ते निःशंक होते. त्यामुळें जेत्यांच्या शस्त्रास्त्रांची तमा त्यांना वाटली नाहीं. राष्ट्राच्या आदर्शाचे आपण रखवालदार आहोंत, मानवांच्या स्वप्नाचे किमयागार आहोंत आणि त्याच्या भविष्यकालीन मुल्यांचे शिल्पकार आहोंत असा अभंग आत्मविश्वास ते घेऊन आले होते. त्यामुळें जीवनाचे कोणतेहि आवाहन त्यानीं टाळलें नाहीं. आपण ईश्वराचे लाडके आहोंत आणि त्याने या महान् कामगिरीवर आपली योजना केली आहे हें त्यांनीं प्रतिभेच्या पहिल्याच साक्षात्कारांत ओळखलें होतें. पण त्यासाठीं केवळ ईश्वरदत्त प्रतिभेवर विसंबून चालणार नाहीं, आपल्याला आपल्या जीवनाचीच यज्ञवेदी करावी लागेल आणि त्यांत हवीहि आपण आणि ज्वालाहि आपणच याचा प्रत्यय क्षणोक्षणीं घ्यावा लागेल हेंहि त्यांनीं ओळखलें होतें,

गुरुदेवानीं ही आपली नियति पौगंडावस्थेंतच ओळखली आणि आपल्या निरलस जीवनसाधनेनें आत्मविश्वासाचा मृत्युंजयी प्रकाश आपल्या राष्ट्रालाच नव्हे तर मनुष्यमात्राला आणून दिला. 'वसुधैव कुटुंबकम्' ची आर्ष घोषणा त्यानीं सर्व भोग्य जीवनसत्य बनवून आमच्या हातीं दिली.

हें जें त्यांना साधलें तें कांही सुखासुखी साधलेलें नाहीं. रक्तबंबाळ पायांनीं वाटेंतले कांटे त्यांनीं एकाकीपणें तुडवले आहेत आणि वादळी अंधारांत लोकांनीं दारें लावल्यावर बरगडीची वज्रशलाका करून स्वतःला धीर देत ते एकटेच चालत राहिले आहेत.

अमर आनंदाकडे, अपार आनंदाकडे जाणाऱ्या सौंदर्य यात्रीला ही असली खडतर वाट अशीच चालावी लागते. पण त्याच्या रक्तबंबाळ पावलांच्या ठशागणिक मंगलाचीं चिरसुंदर रक्तकमलें उमटलेलीं असतात आणि त्यांतूनच युगांच्या चैतन्याचा सुगंध पुढची वाट सांगत असतो.











# एक विस्मृत मराठा वीरपुरुष

## पं. सखाराम गणेश देऊसकर

१ जानेवारी १९६१ पासून वंगीय साहित्य संमेलन महाराष्ट्राच्या राजधानींत भरणार आहे. याच दिवशीं पंतप्रधान नेहरू कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांच्या जन्मशताब्दीच्या अखिल भारतीय महोत्सवाची नांदी मुंबईत करणार आहेत. अशा अपूर्व प्रसंगीं वंगाली साहित्यांत भर घालणाऱ्या एका महाराष्ट्रीय व्यक्तीचा परिचय करून देणारी लेखमाला सुरू करण्यास आम्हांला आनंद वाटतो. संपादक, साहित्यिक, संशोधक, क्रांतिकारक आणि क्रांतिकारकांची 'गीता' ठरलेल्या 'देशेर कथा' या ग्रंथाचे लेखक, राष्ट्रभाषेचे जुने पुरस्कर्ते, वंगालमधील शिवाजी उत्सवाचे प्रेरक, प्राध्यापक इत्यादि विविध नात्यांनीं पं. सखाराम गणेश देऊसकरांचा हा परिचय २६ जानेवारीच्या प्रजासत्ताक स्मृतिदिनीं वाचकांस औचित्यपूर्ण वाटेल.

'आमादेर देश प्रकृतिदेवीर प्रियतम लीला–निकेतन। एई पुण्यभूमिते कि गगनस्पर्शी पर्वतश्रेणी, कि उत्ताल–तुरंगमय नीलांबुपूर्ण अपार समुद्र, कि बहुदूर–प्रवाहिनी स्रोतस्विनी, कि अनंत-वालुकामयी मृत्यु–भीषणा मरुभूमि, कि वृक्ष–लता–पुष्प–विचित्रा उद्यान–भूमि, कि श्वापद–समाकूल गहन कानन, कि सौधमाला–परिशोभित समृद्धिशाली जनपद, कि मरकत–प्रभा–शोभायमान कृषिक्षेत्र, कि ताल–तमाल-कदली–नारिकेल–परिवेष्टिता पल्लिभूमि, कि सिद्ध–सन्न्यासिगणेर योगाश्रम—कोनओ दृश्येर अभाव नाई। एक कथाय भारतवर्ष जगतेर प्रदर्शनागार, भारतभूमि जगतेर ज्ञान, सभ्यता ओ धर्म-तत्त्वेर आदि जननी। आमादेर प्राचीन शास्त्रकारगण बलेन,–बहुपुण्यफले लोके एइ पवित्र कर्मभूमि भारतवर्षे जन्म ग्रहण करिया थाके।'

बंकिमचंद्रांच्या साधु शैलीची आठवण करून देणारा वरील बंगाली परिच्छेद एका मराठी माणसाच्या लेखणींतून उतरला आहे असें सांगितलें तर क्षणभर आपण विश्वास ठेवणार नाहीं. पण ती वस्तुस्थिति आहे. ५० वर्षांपूर्वी बंगाल्यांत होऊन गेलेल्या या व्यक्तीनें महाराष्ट्राची ओळख बंगालला करून देण्याचें पुण्यकृत्य केलें. बंगाली भाषेवर त्यांनीं एवढें प्रभुत्व मिळविलें कीं प्रौढ आणि प्रतापी साहित्यिकांनीं माना डोलविल्या. अंशतः कां होईना साहित्यरूपानें त्यांची स्मृति बंगालमध्यें अजूनही सुरक्षित आहे. महाराष्ट्राला मात्र आपल्या या सुपुत्राच्या कर्तबगारीची विस्मृति झाली आहे.

लो. टिळकांच्या चरित्रग्रंथांतून शिवाजी उत्सवाच्या संदर्भात त्यांच्या नांवाचा तुरळक उल्लेख येतो तेवढाच मराठी वाङ्मयांतील त्यांचा निर्देश! बंगाली साहित्याशीं ज्यांचा परिचय वाढला आहे अथवा बंगालमध्यें कांहीं काळ ज्यांचें वास्तव्य झालें आहे अशा मराठी मंडळींच्या कानांवरून पं. सखाराम गणेश देऊसकर हें नांव गेलेलें असतें. विशेषतः पुराण्या पिढींतील बंगाली लोक ज्या आदरानें त्या नांवाचा उच्चार करतात तें पाहून या माणसाविषयीं अधिक माहिती असावी अशी जिज्ञासा निर्माण होते. 'दीपावली'च्या 'क्रांति-संस्मरण' विशेषांकासाठीं गतवर्षी कांहीं बंगाली पुस्तकें चाळण्याचा योग आला. सशस्त्र क्रांतीच्या प्रयत्नांविषयीं इतिहास, चरित्रें, आठवणी, पत्रव्यवहारादि विपुल वाङ्मय बंगालींत उपलब्ध आहे. या वाङ्मयांतून पं. देऊसकरांचा उल्लेख वारंवार वाचून प्रस्तुत लेखकाची जिज्ञासा पण चाळविली गेली. बंगाली, इंग्रजी, हिंदी व मराठी या चार भाषांतील पुस्तकें व नियतकालिकें यांचा कसून शोध घेतल्यावर बरीच माहिती जमा झाली. त्या माहितीच्या आधारानेंच हा परिचय-लेख लिहिला आहे. वाचकांच्या पवित्र जिज्ञासेची अंशतः परिपूर्ति त्यामुळें झाली तरी समाधान होईल.

श्री. बा. जोशी

### पूर्ववृत्त

देऊसकरांचें घराणें विद्यानुरागी पंडितांचें म्हणून पूर्वीपासूनच विख्यात होतें. रत्नागिरी जिल्ह्यांतील मालवणजवळील देऊस त्यांचें मूळ गांव. जातीनें कऱ्हाडे ब्राह्मण. १७४८ सालीं नागपूरकर रघूजी भोंसल्यांचा बंगालच्या नवाबाशीं–अलिवर्दीखानाशीं जो तह झाला त्याअन्वयें चौथाई पोटीं म्हणून ओडिसाचा मुलूख भोसल्यांना मिळाला. त्यावेळीं रघूजीचा वकील म्हणून कृष्णभट्ट रायकर हा मुत्सद्दी बंगाल्यांत मुर्शिदाबादेस येऊन राहिला. वीरभूमीचा (वीर-भूम) सुभेदार बादियाज्जामाखानाचें व अलिवर्दीखानाचें त्या सुमारास बिनसलें होतें. नवाबानें सुभेदारास त्रास देण्यास सुरुवात केली. या प्रकरणांत कृष्णभट्टांनीं मध्यस्थी करून नवाबाची समजूत घातली. या कामगिरीचें कौतुक म्हणून सुभेदारानें कृष्णभट्ट रायकरांना वैद्यनाथजवळील करौं हें गांव जहागीर करून दिलें. कृष्णभट्ट पुढें येथेंच स्थायिक झाले. पंडित सखाराम गणेश देऊसकरांचे आजोबा सदाशिव विठ्ठल हे शेवटच्या बाजीरावाचा भाऊ अनंतराव याच्या आश्रयास असत. महाराष्ट्रांत स्वातंत्र्यसूर्य अस्तास जात असतांना जी अनेक घराणीं परागंदा झालीं त्यापैकीं हें देऊसकरांचें होतें.











अनुक्रमणिका

अनंतरावांबरोबर सदाशिव विठ्ठल प्रथम चित्रकूट व नंतर काशी येथें गेले. कृष्णभट्ट रायकरांचे वंशज रामकृष्णपंत त्यावेळीं काशीक्षेत्रीं वास्तव्य करून होते. याच रामकृष्ण रायकरांच्या भगिनीशीं सदाशिव विठ्ठल यांचा विवाह झाला. वरदक्षिणा म्हणून रायकरांनीं आपल्या जहागिरीच्या करों गांवांतील जमीन दिली. तेव्हां सदाशिवराव तेथें शेती करून निर्वाह करूं लागले. त्यांना १ पुत्र व १ कन्या अशी संतती होती. पुत्र गणेश सदाशिव काशीस जाऊन वेदाध्ययन करून आले. त्यांच्या व्युत्पन्नतेवर प्रसन्न होऊन गिधोरचे महाराज जयमंगलसिंह यांनीं त्यांना आश्रय दिला. करों गांवीं वास्तव्य कायम ठेवून शेती व उपाध्यायाची वृत्ति त्यांनीं सांभाळली. तेथेंच संवत् १९२६ च्या पौष मासांतील शुक्ल चतुर्दशीस ( १७ डिसेंबर १८६९ ) रोजीं सखारामपंतांचा जन्म झाला.

## बाल्यकाल

त्यांच्या जन्मकालीं ग्रहस्थिति कशी होती कोणास ठाऊक ! पण सुखस्वास्थ्य त्यांच्या भाळीं विधात्यानें लिहिलें नव्हतें खास ! प्रतिकूल अदृष्टाशीं त्यांचीं उमेदीचीं वर्षें, किंबहुना सारी हयात खर्ची पडली. शैशवांतच दुर्भाग्याचीं चिन्हें दृग्गोचर झाली. पांचव्या वर्षीच त्यांच्या मातोश्री निधन पावल्या. त्यानंतर गणेशपंतांनीं दुसरा विवाह न करतां स्वतःच मुलाच्या भरणपोषणाचें दायित्व पत्करलें. अतःपर त्यांच्या जिवाभावाचें, वात्सल्याचें एकमेव निधान म्हणजे सखाराम ! त्यांच्या बहिणीनें या मातृसुखास आंचवलेल्या पोरक्या पोरावर पांखर घालण्याचें ठरविलें. सखारामपंतांच्या या आत्याबाई शहाण्या आणि संसारचतुर बाई होत्या. विद्याप्रेमाचा वारसा त्यांनींही सांभाळलेला होता. जुनें मराठी साहित्य त्यांच्या जिव्हाग्रीं असे एवढेंच नव्हे तर पित्याच्या व बंधूच्या अध्ययन-अध्यापनामुळें संस्कृत भाषा व धर्मशास्त्र यांतही त्यांची गति होतो. त्यांच्या सान्निध्यांत सखारामपंतांच्या कोमल बुद्धीस योग्य वळण लागलें. ही शिकवण उत्तरायुष्यांत फलद्रूप झाल्याचें ते कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत. मराठी संतवाङ्मयाची गोडी आत्याबाईनींच त्यांना लावली. त्यामुळें पुढें मराठी साहित्यांतील रत्नराजीनें वंगसाहित्यभांडाराची संपद-वृद्धि करणें त्यांना सहज शक्य झालें.

करों गांव हें संताळ परगण्यांत मोडतें. आज बिहारमधील वैद्यनाथ-देवघरजवळ ते आहे. नजिकचें रेल्वेस्टेशन कर्मटांड. पूर्वी हा प्रदेश बंगालमध्येंच होता. त्यामुळें बंगाली भाषाच तेथें प्रचलित होती. तीर्थरूपांनीं जुन्या पद्धतीनें संस्कृतची संथा देण्यास केव्हांच सुरुवात केली होती. प्रारंभिक वेदाध्ययन पूर्ण झाल्यावर मुलाची धारणाशक्ति ध्यानांत घेऊन त्यांना देवघरच्या इंग्रजी शाळेंत दाखल करण्यांत आलें. देवघर हें वैद्यनाथाचें क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. तेथील हवापाणी चांगलें असल्यानें अनेक सुखवस्तु बंगाली कुटुंबें तेथें स्थायिक झालीं होतीं व तेथील शाळा नांवारूपास आली होती. मायकेल मधुसूदन दत्तांचे चरित्रकार योगींद्रनाथ बसू या शाळेचे हेडमास्तर होते. मोठा बाणेदार माणूस ! शिवाजी महाराजांविषयीं त्यांना अपार आनंद ! त्यांचें ' शिवाजी महाकाव्य ' त्याकाळीं सर्वत्र वाखाणलें गेलें होतें. शिवाजी महाराजांच्या पुण्यभूमींतील या बलाख मराठी-छात्रावर त्यांची तेव्हांच माया जडली. देशाच्या वीरगाथा वाचण्यास त्यांनीं बालसखारामला प्रेरणा दिली. बंगाली साहित्याची गोडी लावली, जुनें बंगाली वाङ्मय वाचून घेतलें. बंगाली भाषेंत ते त्याच्याकडून निबंध लिहवून घेऊं लागले. कडव्या राष्ट्रभक्तीचें बाळकडू अशा रीतीनें त्यांना शाळेंत असतांनाच मिळालें. १८९० सालीं ते प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झाले. कॉलेजांत जाण्यासारखी परिस्थिति नव्हतीच. १८९३ सालीं देवघरच्या शाळेंत दरमहा १५ रुपये पगारावर असिस्टंट मास्टर म्हणून नेमणूक झाली.

## लेखनास आरंभ

शिक्षकाचा पेशा पत्करण्यापूर्वीच त्यांनीं विविध विषयांवर स्फुट लेखन सुरू केलें होतें. योगींद्रनाथ बसूंशिवाय आणखी एका थोर व्यक्तीचा प्रभाव त्यांजवर पडला होता. श्रीअरविंदांचे आजोबा आणि वंग देशांतील देशहितरत मनीषी राजनारायण बसु देवघर येथें आपला वृद्धापकाळ व्यतीत करीत होते. नवबंगालच्या पुनरुत्थानाचा ऋषि राजनारायण म्हणजे चालता-बोलता इतिहासच होता ! बसु महाशय परम धार्मिक, विद्वान्, साहित्यप्रेमी आणि लोकसंग्रही होते. सखारामपंत त्यांच्याबरोबर नेहमीं चर्चा करीत असत. तेथेंच बंगालमधील नामांकित व्यक्तींशीं त्यांचा परिचय होऊं लागला. श्री. हेमेंद्रप्रसाद घोष यांचा व त्यांचा घनिष्ठ परिचय तेथेंच झाला. सखारामपंत शाळेंत होते तेव्हांच घोषमहाशय योगींद्रनाथ बसूंकडे येत असत. तेव्हां झालेला परिचय राजनारायणांच्या बैठकींत दृढ झाला. हेमेंद्रप्रसाद हे त्यावेळी लेखक म्हणून लौकिक मिळवूं लागले होते. दोघांचेही विचार ज्वलंत राष्ट्रीय बाण्याचे, शिवाजी व टिळक यांचा दोघांनाही अभिमान–त्यामुळें त्यांचे स्नेहसंबंध कायम राहिले. (आपल्या सुदैवानें श्री. हेमेंद्रप्रसाद घोष अजून विद्यमान आहेत, एवढेंच नव्हे तर ८५–८६ वर्षें उलटली तरी लेखन करीत आहेत. वंगीय वृत्तपत्रसृष्टींत त्यांना मानाचें स्थान आहे.) हेमेंद्रप्रसादांचे एक आप्त ' प्रतिभा ' मासिक चालवीत असत. त्यांत तरुण सखारामपंत व हेमेंद्रप्रसाद दोघेही नियमानें लिहूं लागले. मासिक अल्पजिवीच ठरलें. त्या काळांत प्रसिद्ध झालेल्या देऊसकरांच्या लेखांत शैलीची सफाई कमी आढळते खरी. पण उत्तमोत्तम लेखकांच्या बरोबरीनें या पोरसवदा परप्रांतीयाचे लेख येणें ही कांहीं कमी महत्त्वाची गोष्ट नव्हती. " मात्र अल्पावधींतच एकाग्र साधना करून त्यांनीं बंगाली वृत्तपत्रसृष्टींत नामांकित लेखकांच्या तोडीचें स्थान मिळविलें. त्यांच्या सर्वच कार्यकलापावर या अनन्य व एकचित्त साधनेचा ठसा आढळतो." अहर्निश परिश्रमानें त्यांनीं भाषा अशी कांहीं कमावली कीं आघाडीच्या नियतकालिकांतून त्यांचें लेखन प्रकाशित होऊं लागले. त्या काळांत बंगालींत संस्कृतनिष्ठ अशा ' साधु ' शैलीचा प्रभाव अधिक होता. संस्कृत साहित्याचें अध्ययन देऊसकरांना साहजिकच उपकारक ठरलें. सुरेशचंद्र समाजपति त्यावेळीं ' साहित्य ' मासिक चालवीत असत. ' साहित्य'ची गणना त्यावेळच्या पहिल्या दोन–चार मासिकांत होई. व्युत्पन्न साहित्यिक आणि करडे टीकाकार म्हणून समाजपतींचा लौकिक होता. ईश्वरचंद्र विद्यासागरांचे ते नातू. आजोबांकडून लाधलेल्या संस्कारधनाची त्यांनी उत्तम जपणूक केलेली. त्यांनीं वेळोवेळीं सखारामपंतांस उत्तेजन दिलें, ' साहित्यां 'त

(पान ५१ वर चालू)










# अरे दिवा लावा कोणी तरी

ग. दि. माडगूळकर



'अरे, दिवा लावा कुणी तरी—'

अंथरुणावर पडून तळमळणारे माझे वडील क्षीण आवाजांत म्हणाले. आई त्यांच्या उशाशीं बसली होती. दोन्हीं चुलते पायगती बसले होते. माझीं सारीं भावंडें आसपासच होतीं. सारीजणें सचित अवस्थेंत येणाऱ्या प्रसंगाची वाट पाहात होतीं. बाहेर सोप्या-वर गांवांतलीं कैक प्रतिष्ठित माणसें थांबलेलीं होतीं. वडिलांचें म्हणणें कुणीच ऐकलें नाहीं. दिवा लावण्याची इच्छा त्यांनीं बेशुद्ध-पणांतच व्यक्त केली, अशी सर्वांची कल्पना. मी उठलों आणि समई लावली. दिवे-लागणीला अजून अवकाश होता. सरत्या सूर्याचे किरण त्या खोलींतहि रेंगाळत होते. मला काय वाटलें कोण जाणें, तोंडपाठ असलेला गीतेचा एक अध्याय, मी खालच्या आवाजांत म्हणण्यास आरंभ केला. माझ्या पाठाचें 'कृष्णार्पण' होईतों सारा देखावा तटस्थ राहिला. वडिलांनीं कांहीं हालचाली केल्या. आईनें त्यांच्या पायांवरचें पांघरूण सरळ केलें, इतकेंच.

'श्रीकृष्णार्पणमस्तु'

माझ्या तोंडांतून पाठाचा पूर्णविराम बाहेर पडला आणि समोरच्या आकाशांत सूर्यास्त झाला. वडिलांचें सर्वांग एकदम थरारल्यासारखें झालें. कुणी तरी भेदरल्या आवाजांत मला हांक मारली–'अण्णा–'

मी त्वरेनें वडिलांच्या उशाशीं गेलों. त्यांचें मस्तक माझ्या मांडीवर घेतलें. त्यांना कांहीं तरी बोलावयाचें होतें, पण ते बोलूं शकत नव्हते. कुणी तरी मंध्येची भरलेली पळी माझ्या हातीं दिली. त्यांच्या उघड्या ओठांत मी गंगाजळ घातलें. तें तीर्थ परत फिरलें. त्यांच्या हनुवटीवर ओघळलें. मान लटकी पडली. शरीर निश्चेष्ट झालें.

हें घडणार होतें, हें मला माहीत होतें आणि तरीहि तें प्रत्यक्ष घडल्यावर माझ्या हातापायांतलें बळ गेलें. मोकळेपणानें रडतां येईना. ओरडतां येईना. उभें राहवेना. बसा-वेसें वाटेना. डोळ्यांपुढें काळोख दाटला. जगरहाटीला सरावलेले हात पुढच्या कामाला लागले. मोडलेल्या मनानें मी बसून राहिलों. कानांना ऐकूं येईनासें झालें. डोळ्यांना दिसेनासें झालें. मन मयांच्या गीतापाठा-सारखा साद काढीत बडबडत राहिलों, 'पुनरपि जननम्, पुनरपि मरणम्, पुनरपि जननीजठरे शयनम्.' मोडलेल्या सादांत अखंड पुटपुटत राहिलों.

पौषांतली थंडी, चतुर्दशीचें चांदणें, साऱ्या गांवाची सहानुभूति, भावंडांची रडारड, यांतलें कांहीं कांहीं मला समजलें नाहीं. एखाद्या निर्जीव यंत्रासारखाच मी अंत्ययात्रेच्या अग्र-भागीं राहिलों. यंत्राच्या हातांनींच जन्म-दात्याच्या शरीराला मी मंत्राग्नि दिला. अपरात्रीं क्षौर करवून घेतलें. विहिरीच्या बर्फतुल्य पाण्यांत स्नान केलें. सारें केलें पण जणूं कांहींच केलें नाहीं. मी बधीर झालों होतों. चेतनाहीन झालों होतों. मनाचा मुका पाठ मात्र अखंड चालू होता, 'पुनरपि जननम्, पुनरपि मरणम्'

दहनभूमीवरून परत यायला भली पहाट झाली. केशहीन झालेल्या टाळूवरून, येणाऱ्या दिवसाची पहिली झुळूक वाहून गेली आणि मनांतला आवाज मंदावला. डोळे उघडे झाल्यासारखे वाटले. चंद्राचा फिक्का प्रकाश त्यांना जाणवला. झाडांच्या आकृति झाडां-

अनुक्रमणिका

ऱ्याच आहेत इतकें समजल्यासारखे सारखे झाले.

घरीं आलों. अस्मा जपून ठेवला. ओले कपडे बदलले. वडिलांच्या खोलींत दिवा लागला होता. तो विझू नये म्हणून त्यावर शिसर झांकलें होतें. जातांना ते म्हणाले होते, 'कुणीतरी दिवा लावा' तो आतां लागला होता. मला भडभडून आलें. तोंडांतून हुंदका बाहेर पडला नाहीं. पण डोळ्यांतून ओघळ सुरू झाले. वडील गेले. आपण निराधार झालों. त्यांच्या अवजड जबाबदाऱ्या आपल्याच्यानें पेलवणार नाहींत. त्या माणसाबरोबर हें घर नाहींसें झालें. विलक्षण निराशेनें मी पुनः एकवार सचैल भिजलेल्या माणसाप्रमाणें थरथरूं लागलों. एक प्रौढ पण प्रेमळ आवाज माझ्या कानाशीं कुजबुजला 'अण्णा कांहींतरी खाऊन घे'

'नको' मी उगीच मोठ्यांदा ओरडलों.

'खावं लागतं. तोंड गोड करावं लागतं.'

प्रसंगाचा कडूपणा माझ्या रोमरंध्रांत भिनला होता. तोंड तें कशानें गोड होणार होतें? वडिलांनीं मिळवलेला लौकिक, त्यांनीं कमावलेली सहानुभूति पुढच्या आयुष्यांत कमावणें माझ्या शक्तिबाहेरचें होतें. त्यांच्या इच्छेला मान देऊन मी दिवा लावला होता. पण आतां त्यांच्या निर्वाणस्थळीं तेवणारा दिवा तेवता ठेवणें माझ्या आवाक्यांत नव्हतें. स्नेहाचा सांठा त्यांच्याबरोबर गेला होता. तेजाची झळाळी त्यांच्याबरोबर नाहींशी झाली होती. नुसती कापसाची वात, ज्योत म्हणून झळाळूं शकणार नव्हती.

आंसवांनीं आंधळेपण आलेल्या डोळ्यांनींच हातपाय धुण्यासाठीं मी आडाच्या खोलींत गेलों. त्या खोलींत गाढ अंधार होता. आदमासानेंच मी घंगाळें चांचपलें. तांब्या भरून घेतला. पायांवर पाणी ओतणार, इतक्यांत कोंपऱ्यांत कांहीं हालचाल झाली. काळ्यांत काळें उमगलें नाही. तें काय असावें याचा विचार करण्यापूर्वीच मी कोपऱ्यांतली एक लांकडाची फाळ उचलली आणि भिरकावली. 'ठक्क्' असा आवाज झाला. त्या सादाबरोबर एक सूक्ष्म किंकाळी उठली. अंधाराचीच एक आकृति तडफडल्याचें जाणवलें. पुनः आवाज उठला नाहीं.

मी कांहींतरी ठार मारलें. स्वतःच्या मस्तकावरचें छत्र हरवून बसलेल्या एका अविचारी माणसानें एक हत्या केली. अकारण केली. माझ्या हातून काय मेलें होतें कुणास ठाऊक. माझें काळीज पिळवटून आलें. वडिलांच्या आजारांतील त्यांच्या यातना डोळ्यापुढें दिसूं लागल्या. त्या साधुतुल्य पुरुषाला मृत्यूनें फार कष्ट दिले. मी मुर्खानें एक जीव अकारण जगांतून उठवला. माझ्या प्रहारानें कुणाचें आयुष्य संपलें तें पाहाण्याचा धीर मला झाला नाहीं मी आडाच्या खोलींतून बाहेर आलों. मला वेळ लागला म्हणून काका मागच्या अंगणांत आले होते. लहान मुलासारखी मी त्यांच्या गळ्याला मिठी मारली.

'अरे, असं काय करतोस?' माझ्या पाठीवरून हात फिरवीत, स्वतः गहींवरून काका म्हणाले. त्यांच्या मनीं मी वडिलांच्या निधनाचेंच दुःख रडत होतों.

'तुला धीर धीरला पाहिजे. तूं मोठा आहेस.'

'काका!'

'काय? असं कां करतोस? इतका वेळ सांभाळलंस आणि आतां—'

'काका माझ्या हातून हत्या झाली हो!'

'कुणाची?'

'आडावरच्या खोलींत कांहींतरी होतं. कुत्रं मांजर कांहींतरी असेल. तो जीव माझ्या हातून उगीचच मेला—'

'एवढंच ना. मी बघतो तें. तूं जा. दोन घांस खा—'

मी आंत आलों. काका माझ्या पाठोपाठ आले. कंदील घेऊन बाहेर गेले. माझ्या मनाची तगमग कांहीं केल्या थांबेना. ईश्वरानें माझ्या वडिलांना अकारण जन्मांतून उठवलें, मी त्यापेक्षां निराळें काय केलें? त्या अंधारांतल्या जिवानें माझें काय विघडविलें होतें म्हणून मी त्याची हत्या केली? दुःखातिशयानें अधू झालेल्या माझ्या मनाला वडिलांच्या मृत्यूपेक्षां त्या मुक्या जिवाच्या हत्तेचें दुःख अधिक पोळूं लागलें. विचारांना रस्ता उरला नाहीं. लहान मुलानें पाठीवर मारलेल्या रेघोट्यांसारखे त्यांचे रस्ते गिचमिड झाले. अक्षम्य अपराधाच्या जाणिवेनें शरीराची शीरन्‌शीर दुबळी झाली. अपराधाआधीं सजा देणाऱ्या नियतीचा दरारा मस्तकांत ढोलासारखा घुमूं लागला. मी उभाच होतो. कुणीतरी ताट मांडलें. भाकरी आणि गुळाचा खडा माझ्या पुढ्यांत ठेवला. तें अन्न खाणें मला शक्य नव्हतें. माझें तोंड गोड होणें अगदीं अशक्य होते. मी नुसता दुःखी नव्हतों. हत्यारा नव्हतों. खुनी होतो.

काका आंत आले.

'काय होतं तें काका?' मी विचारलें.

'कुत्रं'

'कुठचं ?'

'घरचंच !'

'काळ्या'

'हुं'

'मेलं'

'हं, फाळ टाकूनरच बसली त्याच्या.'

मला कपाळ बडवून घ्यावेंसें वाटलें. त्या कुत्र्यानें कितीदां माझे पाय चाटले होते. कितीदां मी त्याला कोकरूं उचलून घ्यावें तसें छातीशीं घेतलें होतें. या वाड्याची राखण त्यानें केव्हढ्या जागरूकपणानें केली होती. फार गुणी कुत्रें होतें तें. आम्ही शहराकडे निघालों म्हणजे तें स्टेशनपर्यंत पोंचवीत यायचें. त्या कुत्र्याला कां मारलें मी ? माझ्या हातून कां हत्या झाली त्याची ?

अनावस्था, अंधारांत माझा प्रहार त्या मुक्या प्राण्याच्या मस्तकीं लागला. माणसाला कुत्र्याची काय किंमत ? त्या अनापराध जिवाची हत्या झाली ती, अपघातानें. अजाणता. मृत्युहि असाच अजाण असेल कां ? गुणी माणसाचा अंत त्याच्या हातून असाच अजाणता होत असेल कां ? त्या सर्वशक्तिमान् सामर्थ्याच्या हिशेबीं सारे जीव सारखेच असतील. पापपुण्याच्या कल्पना फोलच कां मग ? एकाद्याच्या मरणाला खरोखरीच कांहीं कारण असेल कां ? प्रकाशमय सामर्थ्याला पृथ्वीवर सारा अंधारच दिसत असेल कां ? त्या सामर्थ्यालाहि सुखदुखें असतील कां ? अजाणता प्रहार करण्याची प्रेरणा त्यालाहि होत असेल कां ? माझ्या विचारांना आदि अंत राहिला नाहीं. त्यांची वडवड वाढत राहिली. मेंदूंतला कोलाहल अधिक अधिकच उसळत राहिला. नांवापुरता गुळाचा नख जिभेवर ठेऊन मी हात धुतलें. उठलों--झोंपायच्या खोलींत गेलों. लवंडलों नाहीं. तक्क्याच्या आसऱ्यानें तसाच बसून राहिलों. एकटक कुठेंतरी, आकाशतत्त्वांत बघत राहिलों. अदृष्ट मृत्यु माणसाची निर्हेतुक हत्या करतो, 'या एकाच विचाराची वेडीवांकडी आवर्तनें माझ्या मस्तकांत अखंड घुमत राहिलीं. चक्राकार, लंबवर्तुळाकार, उभी, आडवी, वांकडी तिकडी. तींच आवर्तनें घुमत राहिलीं.

अंगणांतल्या लिंबावरचे कावळे बोलूं लागले. उन्हाचा कवडसा आंत आला आणि आश्चर्य-त्या कवडशा पाठोपाठ तो कुत्रा आंत आला. काळ्या काळ्याच तो. माझ्या हातून अकारण प्राणाला मुकलेला तो जीव परत आला होता. मी वेड्यासारखा उठलों आणि त्याला धरायला धांवलों. तें जनावर घाबरून दूर पळालें. मी त्याचा मृत्यु आहे हें त्यानें ओळखलें होतें. अंधारांतहि ओळखलें होतें. मी पुनः व्यथित झालों.

बापू गडी सकाळचा चहा घेऊन आला. माझ्या डोळ्यांकडे पाहून त्यानें विचारलें--

'काय पाहिजे मालक ?'

'काळ्या, काळ्या कुत्रा आपला'

'त्यो मेला कीं काल'

'मग आतां आलं होत तें कुत्रं ?'

'त्येचीच औलाद हाय. रानोशाच्या कुत्रीचं पिलूं तें'

मी अगदीं गप्प झालों. डोक्यांतला कोलाहल मात्र हलके हलके विरळ झाला. नव्या दिवसाचीं उन्हें आंत आंत सरकूं लागलीं.

• • •



# रंगमंच

पद्माकर गोवईकर

काळ्या ढगानीं आभाळ झांकोळून गेलं आहे. दूरवरचे डोंगर धुक्याच्या झिरमिरीत पडद्याआड दोन गुडघ्यावर बसलेले आहेत. भरून आलेल्या आभाळाशीं वर्षानुवर्षं संवाद करीत स्तब्ध बसले आहेत. घोंगावणारा वारा शीळ मारीत झाडाझुडांतून भरारतोय. हिरव्यागार झाडांना घुसळून काढतोय्. मधूनच वातावरण चिरीत जाणारी एक कर्कश शीट ऐकूं येते. वातावरण डहुळतं. तरंग उठतात. फांकलेल्या रुळावरुन गाडी घसरत जाते. बुबुळांपुढें धांवते. प्रदेश सरकतात. हिरवींचार मैदानें...उंचच उंच कडे.....खळाळणारे जलप्रवाह...खोल दऱ्या......

समोरच्या ख्रिस्तमंदिराचा रक्तवर्णी कळस पोकळीला मागें ढकलीत उंच आभाळांत घुसला आहे. ख्रिस्ताच्या नाजूक धमनीत आरपार शिरलेल्या खिळ्यासारखा तो कुठंवरी रुतूं पाहतों आहे. रक्तासाठ भगभगलेलें त्याचें अग्र केव्हांतरी आभाळाचं रक्त पिणार आहे. अंगाखांद्यावरून ओघळ जाईपर्यंत तें लाल रक्त घटाघट पिणार आहे. एका अंतिम क्षणाला त्याची तृप्ति होईल. कदाचित् होणारहि नाहीं. अतृप्तींतील सनातन गोडीनें सध्यां मात्र तो सुखावलेला दिसतो आहे. तितीक्षेनें पुढं धांवतो आहे......

दूरवरच्या एका झाडाला कांहीं मठ्ठ लोकांना उलटं टांगलंय्. त्यांचीं असंख्य डोकीं गर्दीनें गद्गद्ताहेत. आणि त्यांच्या लांबलचक तगड्या हवेंत पाय आपटताहेत. छे: ! छे: ! डोळ्यांच्या कांचेवर भ्रम झालंय्. तें नारळीचं झाड आहे.

निसर्गाच्या हेतोत्साही वातावरणांत उबदार—थंड पांघरुण पांघरून कुठल्यातरी अडगळीच्या माळ्यावर पडावें, जगाच्या पोटभरू व्यवहारापासून दूर कुठं पळून जावें. ऋतुचक्र फिरत राहावें आणि त्या पांघरुणाच्या उबेंत शरीर झडून जाईपर्यंत पडून राहावें असा विचार करीत मी ऑफिसच्या खिडकींत बसलों आहे.

'मिनिष्टर' नांवाच्या एका काळ्याशार कारकुनाची इतर सारे 'कलिग्ज्' थट्टा करताहेत. महिनाअखेर असल्यामुळें त्याच्याकडून (कमींत कमी) चहा मिळावा अशी प्रत्येकाची त्यामागील अपेक्षा. कुणी त्याला हरबऱ्याच्या घाट्यांगत टचाटच् फोडतें आहे, कुणी नुसतेच त्या झाडावर चढवीत आहे. कारकुनी विनोदांना पावसाळी कुत्र्यांच्या छत्र्यासारखा बहर आला आहे. त्या छत्र्यांखाली जो तो वेड्या आनंदानें (आनंदानें वेड्यासारखें) नाचतो आहे. निर्भेळ विनोदापेक्षां पलिकडे टपाल 'एंटर' करीत बसलेली शर्वरी जोग आपल्या विनोदाला कशी हंसेल याची ईर्ष्या प्रत्येकांत आहे. इरेला पडलेला प्रत्येकजण त्यांत यशस्वी होतोय्. कारण ती प्रत्येकाच्या विनोदाला खुळ्यासारखी हंसते आहे. तिच्या मीनाक्षांतील काळ्या चेटकानं साऱ्यांना बाधा केली आहे. दारिद्र्याचं अस्तर लावलेले कोट घालून सारेजण तिच्या गालावरच्या खळीत पालथे पडताहेत. ती हंसतच आहे. तेहि हंसताहेत. त्यांना माहित नाही कीं, त्या 'मिनिष्टर' बरोबरच ती रविवारच्या 'शो' ला जाते. दोन-तीन प्रसंगीं माझ्याबरोबर ती आलेली असते. हल्लीं आमचं बिनसलंय्. तिचं नी मिनिष्टरचं आतांशा जमलंय्...

कांचेच्या डोळ्यांनीं मी त्या जिवंत सांगाड्यांकडे पाहात आहे. पेपरवेटमधें बसविलेल्या निर्जीव पाण्याच्या आकृतींसारखे ते मला वाटतात. बाहेरच्या झाडावर उलटे टांगलेले ते मठ्ठ लोक मला

*अनाकलनीय बेभान अवस्थेत मीं निथळत चाललों आहे. माझ्या अंगावरून एक मोठा खेंकडा फिरत असल्याचा मला भास होतो. मीं तो झटकतों; पण पुन: पुन्हः तो आपल्या नांग्या फिरवित अंगावर चढतो .........*

अचानक सांपडल्याचा आनंद होतो. क्षणमात्र मी सुखावतो. अभिलाषेची बुळबुळीत लाळ बाहेर फेंकीत शर्वरी जोगच्या टच-टचीत स्तनांना ते लुंचताहेत असं चित्र मला दिसतं.

तोंच नकळत बाजूला वरती माझी नजर जाते, 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ..' असं तोफेच्या वाणीनं गर्जून सांगणाऱ्या सिंहाचं छायाचित्र पाहून मी दचकतों. उद्यां १ ऑगस्ट. पगाराचा दिवस असूनहि केवळ या सद्‌गृहस्थाच्या मरणानं तो मिळणार नाहीं. ( काय करावं या गृहस्थाला ! ) असा कठोर विचार सकाळींच माझ्या मनांत आलेला असतो. आतांचं तें चित्र पाहून मी गोंधळून जातो...

माझ्या डोक्यावर विजेचा पंखा फिरत असतो. त्या पंख्याचा जबरदस्त तडाखा लागून एक चिमणा जीव रक्तबंबाळ होऊन त्या चित्रावर पडलेला असतो. लाल घट्ट रक्ताचे भडक ओघळ छाया-चित्राच्या कांचेवरून वाहात असतात. तसवीर ठोकलेल्या खिळ्याला चिमणीचं रक्तक्लांत प्रेत लोळागोळा होऊन उलटं टांगलेलं असतं. मरतां मरतां जगण्याची केलेली केंविलवाणी धडपड...तें रक्तरंजित छायाचित्र...आणि...

...मला कशाचाच बोध होत नाहीं. जगाच्या खोट्या मुलाम्या-वर नव्या करकरीत ब्लेडनें उभे-आडवे चरे ओढावेत असं वाटतं......

तीन वाजतात. गर्द आषाढांतील पाऊस गळतोच आहे. दूरवरच्या बंगल्यावरच्या तांबड्या कौलारावर दोन टरबाज कबुतरं भिजताहेत, निथळताहेत. त्यांतलं एक लहानगेंसें कबूतर दुसऱ्या मोठ्या कबुत-राच्या अंगलटीला आलं आहे. त्याच्या निळ्या पंखाखालीं जाऊं पाहतें आहे. बहुधा ती मादी आहे.

हॉलमधें मी एकटा आहे. इतर सारे दुपारचा चहा नांवाचें इराण्याचें गढूळ पाणी प्यायला गेलेत. काळा 'मिनिस्टर' साऱ्यांना गंडलेला आहे. विजारी वर धरत कोसळत्या पावसांतून सारे त्याच्याच छत्रींतून गेले आहेत. ऑफिसचें दोन तीन गडी जिन्याच्या पायरी-जवळ तंबाखू चोळत चाबरट गप्पा हाणीत दोन पायांवर बसलेत. अर्धा तास तरी आवार गपचिप होणार आहे. मी हरवलेल्या मनानं बसलों आहे. कसली तरी अबोध हुरहूर मन पोखरत आहे. कुणाची तरी जवळीक मला हवी आहे. मी जळतोंय्...

पलीकडच्या छोट्या खोलींत शर्वरी जोग तिचा ( स्टेन्लेस्चा ) डबा खात आहे. तिच्या केळरंगी हातांतील हिरव्या बांगड्यांची किणकिण मला ऐकूं येती आहे. माझ्या ओठावरचा सुरवंट कात टाकूं लागतो. रक्तवर्णी खिस्तमंदिर, स्वराज्यासाठीं जन्माचं मरण पत्करणाऱ्या एका थोर ऋषीचं छायाचित्र, त्यावर लटकणारं रक्त-बंबाळ चिमणीचं प्रेत, सुकत चाललेल्या रक्ताचे ओहोळ...सारं मी विसरतो......

माझ्या कानांचीं पाळीं गरम होतात. डोक्यांत रक्त चढतं. गात्रं सांकळून जातात. कोंच मादीला बाबाळ करणाऱ्या पारव्याची शक्ति पायांत वळवळते.

शरु जोगच्या अगदीं पाठीमागें येऊन मी उभा राहातों. डब्यांतील उरलेला शेवटचा आमटीचा घोट ती मान वर करून पीत असते. तिचा गोरापान गळा, भरदार नितंब...

झर्रर्कन् पुढं होऊन मी तिला धरतो. माझ्या कमरेचा तिच्या पृष्ठभागाला स्पर्श होतो. तिच्या हातांतील डबा अंगावरून ओघळत खाली सांडतो. मोठा आवाज करून खालीं पडतो. बांगड्यांनी गज-बजलेला तिचा हात आवेगानं दाबून धरून मी तिच्या गालाचा करकचून चावा घेतो "अयाऽऽईऽ" असा दबका आवाज ती काढते. तरीहि Resporse देते...

उबदार मिठी केव्हांतरी सुटते. पिसं गळून पडतात. बांगड्यांचे दोन-तीन तुकडे खालीं पडतात. पदर सांवरला जातो. ओल्या गालावरच्या दंतव्रणांनी ती विव्हल होते. त्यांवरून ती बोटं फिरविते.



गाढ ओठांचे ठसे विझवीत ती उभी राहते. जबाबदारी टाळण्याचं पुण्य पदरीं घेऊन मी खोली बाहेर पडतों...

मी स्थानापन्न झालोंय्. मला आतां फार बरं वाटतंय्. सकाळपासून माझी हरवलेली वस्तु मला सापडली आहे. प्राप्त झाली आहे. अत्यंत समाधानी चेहऱ्यानं मी बसलों आहें. ऑफिस हळूहळू भरतंय् ‘मिनिस्टर ’ला कसा कापलाय् हें जो तो नजरेनं प्रत्येकाला सांगतोय्. चहाचा एक दिवस बाहेर पडला या समाधानांत प्रत्येकजण कागद पुढं सरकावून कामास लागतो...‘ साधं compare करतां येत नाहीं तुम्हाला...’ ‘ओ. बाय् डायरेक्टर (चा शिक्का) द्या हो...’ ‘दोन दिवस झाले ती पा. सी. सांपडेना...’ ‘जोशीबुवा, नंदलालचं (डायरेक्टरला ठेवलेलें नांव) बोलावणं आलंय् ना, या जाऊन !’

ध्वनी उमटत राहातात. कुठलं तरी गीत आळवीत मी खिडकीशीं बसलों आहें. इतक्यांत कुणीतरी बोलतं...

“ अर्धी रजा टाकून कुमारी जोग निघून गेल्या...”

मी सोडून साऱ्यांना आश्चर्याचा झटका बसतो. चर्चा सुरू होते. काळा मिनिष्टर पांढरा पडतो. माझ्या अंगांत आतां कांहींतरी संचारतें. मी लगबगीनें उठतों. खुंटाळीचा रेनकोट डाव्या हातावर घालून मीहि साहेबांना विचारून बाहेर पडतों. बायकोला आज सिनेमा दाखवायचा आहे. ‘जगाच्या पाठीवर’ बरा आहे म्हणते ती......

शर्वरी जोग बसमध्यें चढतांना मला पाहाते. चांगलीच दचकते. मी तिच्याकडे पाहातों. आपल्या छोटुकल्या रुमालानं ती मीं चावलेला गाल टिपते. हळुंवारपणे ती तो गालावरून फिरवते. “ केवढ्यांदा चावलात हो ! ” असं कांहींतरी तिला म्हणायचं आहे.

बस् येते. इकडं तिकडं पाहात ती डाव्या हातांतील पर्स सांभाळते. उजव्या हातानं बस्चा आधार घेत ती आंत चढते. डबल् घंटी वाजते. कुणीतरी ढकलून दिल्यासारखी भर्रर्रकन् बस् दूर दूर जाते. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी हरवलेल्या दिठीनें पाहातों...

पायाच्या कैंचीनं रस्त्याची काळी रिबन् कापीत मी चाललोंय् आनंदाच्या बेहोषीनं माझ्या पोटांत सुखाचे बुडबुडे येतात. साऱ्या वृत्ती मी सैल सोडतों. जणूं कालगतीपासून मी मुक्त झालों आहे. पृथ्वीच्या गोल नितंबावरून मी स्केटिंग करीत धांवतो आहे. आतां माझं अधिराज्य आहे......

दूरवरच्या भिंतीवरचं एक सिनेमा पोस्टर माझ्या डोळ्यांत घस्सकन् घुसतें. एक आंग्ल तरुणी आपल्या कणकीच्या गोळ्यासारख्या नग्न शरीराचं उन्मत्त प्रदर्शन करते आहे. आणि The man of every girl's dream तिच्या लवलवत्या कमरेंत विळखा घालतो आहे. तिच्या उभारस्तनांचा खवा तो हुंगतो: शर्वरी जोग आणि मी दुपारच्या प्रसंगांत...

“ ट्रँझिस्टर ” चेंडूफळीचा सामना



डाव्या बाजूच्या बोळांतून एकाएकीं दिमड्या झांजांचा आवाज येतो. भिक्षा मागत गल्लोगल्लीं फिरणारा एक महारोग्यांचा तांडा मला आडवा येतो. बेछूट बगल देऊन मी पुढें होतों. पण तें दिसतंच. पांगूळगाड्यावर बसलेल्या, हातपाय झिजलेल्या त्या बाईचं पुढं आलेलं पोट माझ्या डोळ्यांवरून फिरत राहातं. माझ्या उघड्या अंगावरून एक भला मोठा खेकडा फिरत असल्याचा मला भास होतो. मी तो झटकतों. पुनः पुनः तो आपल्या नांग्या फिरवीत अंगावर चढतो. पुढं आलेल्या त्या पोटावर जोरदार बुक्क्या मारून तिचा गर्भपात करावा असं मला मनोमन वाटतं......

रप् रप् आवाज करीत पाऊस पडतो आहे. माझ्या हातावरचा रेनकोट अजून हातावरच आहे. अनाकलनीय बेभान अवस्थेंत मी निथळत चाललों आहे. एखाद्या सांडपाण्याच्या जागेंतला दगड उचलावा आणि त्या खालून गांडूळांचें पेंव फुटावं, वळवळत तीं आपल्या पायावर चढावींत...त्या वस्तींतून मी चाललोंय. रंगविल्या चेहऱ्यानं, अंगांत नुसत्या चोळ्या घालून काळ्या बाया खिडक्या खिडक्यांत बसल्यात. जवळ रेनकोट असून भिजत जाणाऱ्या माझी त्या थट्टा करताहेत. खिदी खिदी हंसताहेत...

“ वच्छे, जवळचं कांबळं जाळून ऊब घेनारं गिऱ्हाईक मीं बगितलंय, पन् जवळ कोट असून भिजत जानारं न्हाई पाह्यलं...”

“ बग कीं कसं चाललंय यडं...”

टिटवी ओरडल्यासारख्या साऱ्याजणी हंसतात. खेकडा माझ्या अंगावरून पुनः फिरतो...फिरतच राहातो...

दूर अंतरावर माझं घर दिसतं आहे. माझं घर. माझं बैठं घर. माझी शुचिर्भूत पत्नी. माझं देवघर. प्रकाशाचं रेशमी वलय...पाहिलेले प्रसंग अदृश्य होतात. मनांत प्राजक्ताचा पवित्र वृक्ष बहरतो. सात्विकतेचीं शुभ्र फुलें मी वेचूं लागतो...अधिरतेनं घराचं दार मी उघडतो...

पावसाळी हवेनं आळसटलेलं नितळ शरीर लोकरीच्या रग्मध्यें सुखावीत माझी पत्नी मंचकावर झोपली आहे. माझ्यासह ती एका स्वप्नाच्या निळ्या फुग्यांत परीसारखी हळुवार फिरते आहे. चेहेऱ्यावर गाभाऱ्यांतील आत्यंतिक पावित्र्य ओसंडत आहे. मी थिजून उभा आहे. माझ्या अंगाखांद्यावरून पाणी गळतंय्. विचार करतोंय् कीं हिला उठवावं. भिजत आल्याविपर्यीचं कोडकौतुक करून घ्यावे सोपस्कार करून घ्यावेत. पण नको वाटतं. बिचारी झोंपली आहे. माझी संवेदनाशीलता निबर होते. ओल्या कपड्यांनिशीं मी आरामखुर्चीत आंग झोंकून देतो—

मला हलके हलके शुद्ध येते. कुणीतरी मला जागं करतंय्. खोलवरून कुठून तरी शब्द येताहेत. थकलेले डोळे मी किलकिले करतो.

धूसर कांचेंतून मला माझी पत्नी दिसते. ती बडबडत आहे. लटक्या रागानें माझ्यावर खेंकसते आहे. मला कळतंय् पण ऐकूं येत नाहीं. कांहीं काळ असाच जातो. हलके हलके माझ्या जाणिवेला जाग येते. मी माझ्या घरांत असून आरामखुर्चीत पडलों आहे. माझी पत्नी शेजारी उभी आहे. माझ्या पायांतील बूट नुकतेच तिनं काढलेत. आणि अंगावरचे ओले कपडे बदलण्याविषयीं ती मला आग्रहानें सांगत आहे. तिचे शब्द झिरपत झिरपत माझ्या कर्णपुटांवर आदळतात. हें सगळे मला उमगतें...

"अहो, असं काय करतां, लहान मुलासारखं. उठा बघूं आधी. ओले कपडे बदला आधी. जवळ रेनकोट असून भिजत यायचं कांहीं कारण होतं कां ? हे घ्या कपडे...हा स्वेटर...उठा, उठा... ऊनऊन कॉफी करतें मीं तंवर..."

कढत कढत कॉफीचे घोट घेत मी शेगडीशीं बसलोंय्. शेगडींतील निखारे मस्त फुलून राहिलेत. मी चुलीमागच्या मांजरासारखा सुखानें गुरगुरत शेगडीची ऊब घेतो आहे. दिसूं लागलेल्या डोळ्यांनीं आसपास पाहातों आहे. मोलकरणीनं घासून आणलेली भांडी माझी पत्नी पुन्हां पाणी घालून विसळून घेत आहे. भांडी कल्हईला आलीत असंहि त्यावेळीं मला ती निक्षून सांगते. तिच्या तोंडाची टकळी चालूं आहे. शब्दांचं सूत भराभर बाहेर पडत आहे. अर्थवस्त्र मी विणतों आहे.

एकाएकी मला सिनेमाची आठवण येतें. ऐतिहासिक नाटकांतील शिलेदारासारखा ताडकन् उठण्याचा मी अभिनय करतो. आणि पत्नीला तिचा जामानिमा आवरायला सांगतों. माझी पत्नी एकाएक चमकते. शेल्फवर भांडी लावतां लावतां ती वळून माझ्याकडे पाहाते आणि कपाळावर हात मारून घेते. ( या पोज्मध्यें ती खरंच चांगली दिसते. )

"कपाळ माझं. मघांपासून तेंच तर सांगतें. आज सिनेमा नको. आज आपण तुमच्या आवडत्या टेकडीवर फिरायला जाऊं......"

"मघांपासून ती काय बडबडते आहे तें मला आतां कळायलाच पाहिजे. मी उगीचच आठवूं लागतों...

गांवाबाहेरची उंच टेकडी आम्हीं पतिपत्नी चढत आहों. मी पुढं पुढं चाललोंय्. माझी पत्नी माझ्या दंडाला धरून भरभर चालण्याचा प्रयत्न करते आहे. तिची चप्पल तिला अधून मधून दगा देते आहे. तिकडे दुर्लक्षं करीत पण त्यावरच लक्ष ठेवून ती चालली आहे. कुठल्या कुठल्या गोष्टी सांगत आहे. स्त्रैण खुळचट गप्पा मी बहिऱ्या कानांनीं ऐकतोंय्. थोडंसं कटू बोलून तिचं तोंड बंद करावं असा विचार येतो. पण नको...ती दिवसांत आहे. तिला जपलं पाहिजे.

प्रकाशाचीं कवाडें बंद होताहेत. ताऱ्यांचा एक एक कांकडा मंद पेट घेतो आहे. अंधूक आकार एकमेकांत मिसळून गेलेत. दूरवरच्या क्षितिजावर ओली रात्र आपलीं भिजलेलीं वस्त्रं वाळवीत उभी आहे. पश्चिम समुद्रावरून येणारा गार वारा अंगाला आयोडीनसारखा झोंबतो आहे. माझ्या अंगांत गरम स्वेटर आहे. ( आणि शेजारीं गुबगुबीत पत्नी आहे. ) त्यामुळें वारा एवढा झोंबत नाहीं. माझी पत्नी डोक्यावरून पदर घेण्याचे उगाचच [illegible] करते. माझ्या डोळ्यापुढं



# मला दारू चढत नाहीं

वि. रा. भाटकर

दारुबंदी असूनहि मी खूप दारू पितों. पण मला दारू कधीं चढत नाहीं. याचं एक कारण आहे. दारू पिण्याची माझी एक स्पेशल सिस्टीम आहे. ती अशी —

दारू प्यायची असली म्हणजे मी ती रात्रीं झोंपण्यापूर्वीं पितों. तेव्हां आधीं बायकोच्या खोलींत हळूंच डोकावून पाहतों. बायको पलंगावर गाढ झोंपलेली असते.

मग मी माझ्या खोलींत येतों. दारूची बाटली आणि ग्लास टेबलावर घेऊन बसतों.

प्रथम मी बाटलीचं बूच काढतों. मग तिच्यांतली भरपूर दारू ग्लासांत ओतून घेतों. बूच बाटलीला परत लावून टाकतों आणि बाटली कपटांत ठेवून देतों. मग ग्लासांतली सगळी दारू मी पिऊन टाकतों. मग मोरींत जाऊन ग्लास धुवून टाकतों आणि फळीवर ठेऊन देतों. मग मी पुन्हां बायकोच्या खोलींत हळूंच डोकावून पाहतों. बायको पलंगावर गाढ झोंपलेली असते. बघितलंत ? या कानाचा त्या कानाला पत्ता नाहीं. आणि दारू मला चढलेली सुद्धां नाहीं.

मग जरावेळानें मी पुन्हां बाटली आणि ग्लास काढतों. बाटलीचं बूच काढतों. भरपूर दारू ग्लासांत ओतून घेतों. मग बॉटलीला बूच लावून मोरींत ठेऊन देतों. मग ग्लासांतली सगळी दारू पिवून कपाटांत जाऊन ग्लास धुवून टाकतों आणि फळीवर ठेऊन देतों. मग हळूंच मी बायकोच्या खोलींत डोकावून पाहतों. बायको पलंगावर गाऽढ झोपलेली असते. बघितलंत ? या कानाचा त्या कानाला पत्ता नाहीं. आणि दारू मला अजून चढलेली नाहीं.

मग थोड्या वेळानें मी पुन्हां बाटली आणि ग्लास काढतो. ग्लासाचं बूच काढतो. भरपूऽर दारू कपाटांत ओतून घेतों मग बाटलीला बूच लावून ती बायकोच्या पलंगावर ठेवून देतों मग मोरींतली सगळी दारू पिऊन कपाटांत जाऊन ग्लास धुवून टाकतों आणि फळीवर ठेवून देतों. मग हळूंच बायकोच्या कानांत डोकावून पाहतों. बायको मोरींत गाऽढ झोंपलेली असते. बघितलंत ? या कानाचा त्या कानाला पत्ता नाहीं. आणि दारू मला अजून चढलेली नाहीं.







अनुक्रमणिका

मग थोड्या वेळानें मी पुन्हां बाटली आणि ग्लास काढतों. बाटलीचं बूच काढतों. भरपूर दारू मोरींत ओतून घेतों. मग कपाटाला बूच लावून मोरींत ठेवून देतों. कपाटांतली सगळी दारू पिऊन ग्लासांत जाऊन मोरी धुवून टाकतों. आणि फळीवर ठेवून देतों. मग बाटलीच्या कानांत हळूंच डोकावून पाहतों. बाटली अजून कपाटावर गाऽढ झोपलेली असते. बघितलंत ! या बाटलीचा त्या बाटलीला पत्ता नाहीं. आणि दारू मला अजून चढलेली नाहीं.

मग थोड्या वेळानें मी पुन्हां मोरी आणि कपाट काढतों. मोरींतली दारू कपाटांत ओतून घेतों. अगदीं भरपूऽर. बऽरं का. मग कपाट मोरींत ठेऊन देतों हो, ठेऊन देतों. मग मोरींतली सगळो दारू पिऊन टाकतों. सऽगळी पितो बऽरं का. मग मी बायकोच्या खोलींत जाऊन कपाट धुवून टाकतों. अगदीं साऽफ धुवून टाकतों; बऽरं का. आणि फळी कपाटावर ठेवून देतों. मग कपाटांतल्या मोरींत हळूंऽच डोकावून बघतों. हळूंऽच, बऽरं का. बायको मोरींत गाऽढ झोपलेली असते. हाः हाः हाः ! बघितलंत ! या बायकोचा त्या बायकोला पत्ता नाहीं. आणि मी इटकी डाऽरू प्यायलो पण अजून मला च्यढली णाही खऽरं ना ? [ आधारित ] • • •

---

तिचं पुढचं सोवळ्या बाईचं चित्र उभं राहतं. मी रागानं तिच्या डोक्यावरचा पदर काढतों. माझ्या तिरसट अभिनयाकडे ती रागानें पाहाते. मीहि पाहातों. पुन्हां डोक्यावर पदर घेण्याचं ती धाष्ट्यं करीत नाहीं.

टेकडीच्या माथ्यावरून आतां आम्ही चाललों आहोंत. थोड्याच अंतरावर असलेल्या अश्वत्थ वृक्षाखालीं आम्हीं बसणार आहों. माझी पत्नी अत्यंत सुखावली आहे. मलाहि बरं वाटतंय्. 'आम्हीं वृक्षाशीं पोहोंचतो......

मोकळेपणानं मी खाली बसणार तोंच वृक्षाच्या दुसऱ्या बाजूकडून दबलेल्या हुंदक्यांचा आवाज ऐकूं येतो. आम्ही दोघेंहि विलक्षण चमकतों. हुंदके जोरजोरानें ऐकूं येत राहातात. आम्हीं दोघेंहि मागें वळून तें लोकविलक्षण दृश्य पाहूं लागतो......

गुडघ्यांत वांकून बसलेली एक तरुण स्त्री तोंडावर हात ठेवून रडत आहे. हमसून हुमसून रडत आहे. अश्वत्थाच्या सळसळींत तिचं रडणं भीतिदायक वाटतें. तिच्यासमोर एक पांढरा शुभ्र हातरुमाल अंथरला आहे. आणि त्यावर नाकातोंडाची खांचा झालेली एक मनुष्याची कवटी आहे. भक्तीभावानें वाहिलेलीं दोनतीन लाल भडक फुलं खबदाडांत पडलीं आहेत. त्या विद्रूप आठवणींपुढें ती तरुण स्त्री आक्रोश करीत आहे......

विलक्षण भयानें भेदरलेली माझी पत्नी मला आवेगानं बिलगते. माझ्याहि कणाकणांतून भोंवळ थरकते. साऱ्या धमन्या थंड पडतात. पेटायला रक्तच उरत नाहीं. कुठली तरी छोटी धनुकली माझ्या मेंदूचा कापूस पिंजूं लागते. दिवसभरांत दिसलेल्या त्या अखेरच्या दृश्यावर मी विचार करतोंय्, कीं शर्वरी जोग कुणी चेटकीण तर नाहीं ! • • •



# रामायणकालीन ललितकला

रामायणकालीन भारतवासी मोठे कलारसिक होते. विशेषतः वाल्मिकीच्या रामायणांत याबद्दल अनेक दाखले पहायला मिळतात. बालकांडाच्या सहाव्या सर्गांत वाल्मिकीनें अयोध्येंतल्या नागरिकांचे जे वर्णन केलें आहे त्यावरून अयोध्यावासी जन सुसंस्कृत, कलाभिज्ञ, सौंदर्यप्रेमी आणि सहृदय होते. अयोध्यानगर हे एक कलाकेंद्र होते. कलेला राजाश्रय होता. सामान्य नागरीक सौन्दर्यप्रसाधनेंत कुशल होते. सुंदर पुष्पांचा त्यांना शौक होता. केसांचा आकर्षक शृंगार करण्याची स्त्री-पुरुषांना आवड होती. विविध रंगीबेरंगी वस्त्रें ते वापरीत असत. आंगाला चंदनाची उटी, हातापायाच्या तळव्यांना मेंदी आणि स्त्रियांच्या भालप्रदेशीं कुंकुमतिलक लावण्याची प्रथा होती. अयोध्येंतल्या रमणी स्वतःच्या कपोलावर सुंदर नाजूक पत्रावली रेखाटीत. राजप्रासाद, सामान्य नागरिकांची घरे आणि रथ फुलांच्या माळा, पताका व तोरणें यांनी सजवण्यांत येत. हत्ती आणि घोडे अलंकारांनी नटवीत. नगर व उद्यानें यांच्या कलापूर्ण रचनेकडे लक्ष दिलें जाई.

कला या अर्थी 'शिल्प' हा शब्द रामायणांत वारंवार आला आहे. गीत, नृत्य, वाद्य, चित्र इत्यादि ललितकलांचा त्यांत समावेश होतो. कलेचे दोन प्रकार केले असून त्यांत एक मनोरंजन व दुसरा व्यावसायिक. व्यावसायिक कलावंतांना 'शिल्पकार' म्हणत असत. स्वतः श्रीराम 'वैहारिकाणां शिल्पानां ज्ञाता' असा होता. म्हणजेच संगीत, वाद्य, चित्र या कला त्याला अवगत होत्या. लवांकुशांच्या गायनानें अवघे अयोध्यावासीजन तल्लीन झाले यावरूनही त्यांची कलाभिरुचि सहज स्पष्ट होण्याजोगी आहे.

**भय्यासाहेब ओंकार**

पण केवळ अयोध्यावासीच नव्हेत तर लंकेंतील राक्षस आणि दक्षिणेकडील वानर ह्यांच्याही कलाप्रेमाची उदाहरणें रामायणांत वाचायला मिळतात. यावरून कलेची प्रतिष्ठा सर्वत्र सारखीच होती असें म्हणावयास हरकत नाहीं.

करमणुकीचें साधन एवढेंच कलेचे स्वरूप न मानता परमेश्वरी प्रेरणेशी तिचा संबंध वाल्मिकी रामायणांत जोडलेला दिसतो. कलानिर्मितीसाठीं एकाग्रता हवी आणि त्यासाठीं योगसाधनेचा आश्रय घेतला जाई. समाधीच्या सहाय्यानें कलावंत आपल्या वर्ण्यविषयाशीं तदाकार होत आणि संपूर्ण कलाकृती अंतःचक्षुपुढें उभी करत. वाल्मिकीला नारदानें रामचरित्र थोडक्यांत सांगितल्यानंतर ते अधिक स्पष्टपणें समजून घेण्यासाठीं वाल्मिकीनें समाधी लावली. योगसामर्थ्यानें रामायणांतले सर्व प्रसंग वाल्मिकीच्या अंतर्मनांत साकार झाले. आणि मगच त्यानें रामचरित्र लिहायला आरंभ केला.

**चित्रकला—**

घरांच्या भिंती व कोनाडे यांच्या अलंकरणांत चित्रकलेचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यात येई. रावणाच्या पुष्पकविमानावर सुवर्णखचित चित्रकर्म केलेले होते.

अनुक्रमणिका








मदीकृता पर्वतराजिपूर्णाः
शैलाः कृता वृक्षवितानपूर्णाः।
वृक्षाः कृताः पुष्पवितानपूर्णाः
पुष्पं कृतं केसरपत्रपूर्णम् ॥

जमिनीवर पर्वतराजी, पर्वतावर वृक्षवल्ली, वृक्षावर पुष्पांचा बहर आणि पुष्पे केसर पाकळ्यांनी युक्त असे मनोहर चित्रण करण्यांत आले होते. याशिवायही अनेक रमणीय दृश्ये पुष्पकविमानावर चितारली होती. रावणाचे शव ज्या पालखींतून नेले त्या पालखीवरही सुंदर पुष्पे चित्रित केली होती.

योद्धयांच्या पताकावर तऱ्हेतऱ्हेच्या आकृत्या काढण्यात येत, धुम्राक्षाच्या रथावर मृग व सिंहाची मुखें काढली होती. इन्द्रजिताचा रथ सुवर्णविभूषित अर्धचंद्र व मृग यांनी अलंकृत होता. तर रावणाच्या रथावर पिशाचवदनें चितारली होती.

चित्रशाळा हा शब्दही वाल्मिकी रामायणांत आढळतो. किंबहुना हा शब्द संस्कृत साहित्यात प्रथम वाल्मिकीनेंच वापरला. चित्रशाळा हा शब्द 'चित्रशालागृहाणी' असा अनेक वचनी वापरला आहे. त्यावरून राजमंदिरांतील चित्रशाळा, सार्वजनिक चित्रशाळा असे चित्रशाळांचे विविध प्रकार असावेत. रावणाच्या राजमहालाच्या वर्णनांत चित्रशाळेचा उल्लेख आहे. रामचंद्राच्या राजप्रासादांत भित्तिचित्रें होती. कैकेयीचा राजप्रासादही चित्रांनी युक्त होता.

**शिल्पकला —**

पाषाण व धातुनिर्मित शिल्पकृतींचे उल्लेख रामायणांत आहेत. चन्द्रमुखी सीतेची तुलना मयनिर्मित अद्भुत सुवर्णमूर्तीशी केली आहे. यज्ञदीक्षेच्या निमित्तानें रामानेंही सीतेची सुवर्णमूर्ती बनवली होती. सीतेला प्रत्यक्ष पाहिलेल्या शिल्पकारानें केवळ स्मरणानें तिची ही शिल्पकृती हुबेहुब तयार केली.

रावणाचें पुष्पकविमान हा त्या काळांतला शिल्पकलेचा सर्वोत्कृष्ट नमुना. पुष्पकविमानावर वैदूर्यमणि, चांदी व प्रवाळाचे पक्षी बनवले होते. विविध तऱ्हेच्या रत्नांची सर्परचना केली होती. सुंदर घोडे तयार केले होते. विमानाचे खांब सरळ, उंच आणि सुंदर होते. त्यावर मोती, हिरे, प्रवाळ, चांदी आणि सोने यांचे कौशल्यपूर्ण नक्षिकाम होते. त्यावर 'ईहामृग' नांवाच्या काल्पनिक प्राण्यांचे आकार काढलेले होते. या विमानांत चढण्यासाठीं विश्वकर्म्यानें सोन्याची शिडी बनवली होती. विमानाला सोने व स्फटिक यांच्या जाळ्या व खिडक्या बसवल्या होत्या. इंद्रनील व महानील यांचे चौथरे बसवले होते. मौल्यवान रत्ने आणि मोती फरशीवर जडवले होते. विमानांत कमलासनावर अधिष्ठित झालेल्या आणि हातांत सुंदर कमळें घेतलेल्या लक्ष्मीची रमणीय मूर्ति बसवली होती. तिच्या दोन्ही बाजूस केशरी कमळें सोंडेंत धरलेले हत्ती दाखवले होते. खांबाच्या वरच्या बाजूस लावण्यवती स्त्रियांच्या आकृत्या शिल्पबद्ध केल्या होत्या. कुंडलधारी मोठ्या पोटाचे निशाचर वरच्या बाजूस आणि डौलदार हंस खालच्याबाजूस अशा तऱ्हेनी दाखवले होते कीं जणूं ते हे विमान वाहून नेत आहेत असें वाटें. पुष्पकविमानांत सुंदरमुखांचें अद्भूत पक्षीही बनवले होते. प्रवाळ व सुवर्णपुष्पांनी जडवलेले पंख जेव्हां लीलेनें ते फडफडवू लागत तेव्हां जणूं ते मदनाचे साक्षात् पंखच वाटत.

प्रवालजाम्बूनदपुष्पपक्षाः
सलीलमावर्जित जिह्मपक्षाः।
कामस्य लाक्षादिव भान्तिपक्षाः
कृता विहंगाः सुमुखाः सुपक्षाः ॥

**संगीत कला :**

वाल्मिकीनें आपल्या कृतीला गीत म्हटलें आहे. यावरून वाल्मिकीची रचना केवळ वाचायची नसून गावयाची आहे. वाल्मिकीचें रामायण ही त्या काळांतली अत्यंत लोकप्रिय अशी श्रुतिमधूर गीतरचना होती. रामायणाच्या गीतमाधुर्यावर आश्रमांतील मुनिवर्ग आणि नगरांतील नगरवासी सारखेच लुब्ध होते. 'ह्लादयत्सर्वगात्राणि मनांसि हृदयानिच।' असा स्वतःच्या काव्याचा वाल्मिकीनें योग्य गौरव केला आहे.

काव्य हे 'पाठ्ये गेये मधुरम्।' म्हणजे पाठ करायला आणि गावयास मधूर असावें असें वाल्मिकीचें म्हणणें आहे. काव्याचे संगीत अशा रीतीनें ध्वनी व तालाच्या अनुरोधानें व्हावें कीं ज्यामुळें ते सप्तसुरांत गुंफले जाईल. काव्याची शब्दरचना गेयतेला अनुसरून असावी. त्यांत ओघ असावा. माधुर्य असावें. प्रसाद असावा. नवरसांचा अविष्कार करणारें आणि वीणेच्या कर्णमधूर साथीवर गाता येईल असें काव्य असावें.

स्वरज्ञानाकडे संगीतकार विशेष लक्ष देत. लवांकुशांना 'स्वरसंपन्नौ' म्हटलें आहे. गीताच्या अनुरोधानें वीणा अगर वाद्यांचे स्वर कमी जास्त केले जात. ऋग्वेदांतही उदात्त, अनुदात्त व स्वरित असा स्वरांचा भेद मंत्रांतून आढळतो. पुढें ऋग्वेदांतल्या या स्वरज्ञानाचा विकास सामवेदांत जास्त झाला. रामायणकालांत सामवेदाचे महत्व अधिक होते. दशरथाच्या अंतेष्टीच्या वेळीं विद्वान् ब्राह्मण सामश्रुतींचे गायन करीत होते. उत्तरकांडांत रावण सामस्तोत्रानें शंकराची स्तुति करताना दाखवला आहे. सामवेदाच्या या प्रचारावरून प्राचीन काळीं सामान्यजनांतही शास्त्रीय संगीताची गोडी होती हे सिद्ध होते. दशरथाच्या अश्वमेध यज्ञांत मंत्राच्या शास्त्रीय

उच्चारानें पुरोहित स्निग्ध मधुर गायन करीत होते असे म्हटलें आहे. प्रत्यक्ष रागरागिण्या जरी त्या काळांत रचल्या गेल्या नसल्या तरी तार, मध्य व मन्द्र आलापांत सप्तस्वरांची आभिव्यक्ति होत होती.

स्वरसंगीताबरोबरच वर्णसंगीत हाही प्रकार रूढ होता. त्यांत वर्णांच्या ध्वनीला प्राधान्य होते. हे संगीत मुख्यतः वर्णमालेच्या लघु व दीर्घ अक्षरांतील मात्रा, ध्वनि व उच्चारण्याचा काळ या तीन घटकांवर आधारीत होते. वाल्मिकीनें रचलेला अनुष्टुप छंदांतील पहिला श्लोक हाच वर्णसंगीताचा प्रथम अवतार होय. लघु व दीर्घ अक्षरांचे स्पष्ट व नियमीत् आरोह अवरोह अनुष्टुपवृत्तांत असल्यानें त्यांतून वर्णसंगित उत्पन्न होते. बालकांडाच्या आरंभीच्या सर्गात अनुष्टुपछंदाच्या गेयतेबद्दल वाल्मिकीनें लिहिलें आहे. या गेयतेमुळेंच रामायण एकस्यानें अगर सामुदायिकपणें गायलें जाई.

स्वरसंगीत, वर्णसंगीत याप्रमाणेंच तालसंगीत हा त्या काळांतल्या संगीताचा तिसरा रूढ प्रकार. 'तालापचराः' या नांवाचे संगीतज्ञ तालसंगीतांत विशेष प्रवीण असत. हा संगीतप्रकार नृत्यगायनांत जास्त पापरला जाई. नृत्यांतील हालचाली तालबद्ध असत. ताल दर्शित करण्यासाटीं टाळी वाजवणारे (पाणिकवादकाः) असत. करताल व स्वस्तिक या वाद्यांनींहि ताल धरला जाई. महर्षि भरद्वाजानें भरत व त्याच्या सेनेचें स्वागत करण्यासाटीं केलेल्या समारंभांत संगीतास ताल देण्यासाटीं तालज्ञान असणारांचे वेगळें पथक ठेवलें होतें. वनवासाहून राम आल्यावर मिरवणुकींत अग्रभागीं करताल व स्वस्तिक वाजवणारे होते.

संगीताला गांधर्व व संगीतशास्त्राला गांधर्वतत्व म्हणत. या गांधर्वकलेंत गीत म्हणजे तोंडानें म्हणावयाचे व वादित्र म्हणजे वाद्यवादन असे दोन भाग समाविष्ट होत.

लवांकुशांच्या संगीताच्या वर्णनावरून त्या काळांतल्या चांगल्या गवयासंबंधीच्या अपेक्षा स्पष्ट होतात. वाल्मिकीचे हे दोन्ही शिष्य गांधर्वविद्येंत पारंगत होते. त्यांच्या कंठांत स्वरमाधुर्य होते. स्वराची उत्पत्ति, स्थान व मुर्च्छना या अवस्थांचे त्यांना बरोबर ज्ञान होते. त्यांची धारणाशक्ति अद्भूत होती. त्यांचे उच्चार इतके स्पष्ट होते कीं गीत ऐकताच अर्थ ध्यानांत येई. त्यांचें गायन द्रुत, मध्य व विलंबीत अशा गतीनी बांधलेले असे. वीणेच्या स्वरशीं त्यांचा स्वर मिसळून जाई. वीणेच्या लयीवर मधुर स्वरानीं, प्रसन्न चित्तानी, आणि एकाग्रतेने गंधर्वाप्रमाणें लावण्य असलेले ते कुमार गाऊ लागले कीं संगीताची जणूं एक अखंड मालाच गुंफली जाई. श्रोत्यांच्या अंगावर रोमांच उठत. अनंदोर्मीनें ते बेहोष होत. कितीही संगीत ऐकलें तरी श्रवणेंद्रियें अतृप्तच रहात. त्या कुमारांचा गौरव श्रोतृवृंद जयजयकारानें करीत असे.

**वक्तृत्वकला—**

भावनादर्शित करणारा ध्वनि व स्वर यांनी युक्त अशी वाणी केवळ गायकाचीच हवी असें नाहीं तर वक्त्याचीही वाणी असायला हवी असें वाल्मिकीचे म्हणणें आहे. हनुमानाच्या भाषणाची प्रशंसा करताना श्रीरामानें आदर्श वाणीचें सुंदर वर्णन केलें आहे. भाषणाच्या वेळी मारुतीचे मुख, नेत्रें, ललाट, बाहू वगैरे अवयवांत कोणताही दोष दिसत नव्हता

अगदी थोडक्यांत अतिशय स्पष्टपणें त्यानें आपला अभिप्राय निवेदन केला. अडखळत अगर तुटक शब्दोच्चार त्यानें केले नाहींत. बोलताना त्याचा आवाज फार धीमाही नव्हता अगर उंचही नव्हता. मध्यस्वरांत त्यानें सर्व निवेदन केलें. रामचंद्र म्हणतात, "सुसंस्कृत भाषा, योग्य शब्दरचना आणि मनोल्हादी स्वरं यांनी युक्त असें मारुतीचे भाषण ऐकून कुणाला आनंद होणार नाहीं !"

दशरथाची वाणी 'राजलक्षणयुक्त' होती, राज्यपदावरून निवृत्त होताना त्यानें जे भाषण केले त्याचे वर्णन करताना वाल्मिकी म्हणतो,

"स्वरेण महता राजा जीमूत इव नादयन ।
राजलक्षण युक्तेन,कान्तेनानुपमेनच ।
उवाच रसयुक्तेन स्वरेण नृपतिर्नृपान् ॥

मत्त हंसाचा ध्वनि पुरुषांसाठीं आदर्श मानला जाई. राम व भरत यांच्या स्वरांचे वर्णन 'हंसमत्तस्वर:' किंवा 'कलहंसस्वर:' असें केलें आहे. दशरथ राजाचा स्वर दुदुंभीचे स्मरण करून देई. कैकेय देशाहून अयोध्येस येतांना भरतास स्वतःचे बोलणें स्वरहीन झाल्याचें आढळले. तो त्याला अपशकून मानला. वाल्मिकीनें दशरथाच्या राण्या स्वरपूर्वक रडतांना दाखविल्या आहेत. 'रुरुदुः सुस्वरम्' असें त्यानें वर्णन केले आहे. मृताच्या शोकार्थ करुणगीतें गाण्याचा प्रकार अजूनहि भारतांतल्या कांहीं जातींत रूढ आहे. तो प्रकार रामायणकालापासून रूढ होता असें दिसतें.



**नृत्यकला :—**

गायन व नृत्य यांच्या सहाय्यानें भगवान शंकराची रावणानें आराधना केली.

ततः समामार्तिहरं परं वरं
वरप्रदं चन्द्रमयूखभूषणम् ।
समर्चयित्वा स निशाचरो जगौ
प्रसार्य हस्तान्प्रणनर्तचाग्रतः ॥

नर्तनाच्या नृत्य, नृत्त व लास्य अशा तीन पद्धती सांगितल्या आहेत. नृत्य या प्रकारांत विविध भावांच्या मुद्रा, अंगविक्षेप व अभिनय प्रगट केला जाई. नृत्त या प्रकारांत ताल व लय याकडे विशेष लक्ष देण्यांत येई. लास्य हा एक सुकुमार नृत्याचा प्रकार असून त्यांत नृत्य व नृत्त या दोन्हीचाही मिलाफ झालेला असे. गायन-वादनाची जोड लास्याचे वेळी घेण्यांत येई.

**नाट्यकला—**

रंगभूमीवर नट अभिनय करीत असल्याचा उल्लेख रावणाच्या तोंडी एका रूपकात्मक वर्णनांत आला आहे. 'व्यामिश्रक' म्हणजे संस्कृत व प्राकृत भाषेत रचलेल्या नाटकांचा रामायणांत उल्लेख आहे. यावरून त्यावेळच्या रंगभूमीवर केवळ मूक अभिनय करण्यांत येत नसून संवाद केले जात हे दिसून येते. समाज हा शब्दही मोठ्या प्रमाणावरील प्रेक्षकवर्गाचे अस्तित्व दाखविणारा आहे.

**वास्तुकला—**

नगर, दुर्ग व प्रासाद यांच्या वाल्मिकीनें केलेल्या वर्णनावरून वास्तुकलेंत त्या काळांतल्या लोकांची चांगलीच प्रगती दिसून येते. दानवांचा स्थापती मयासूर यानें तपस्या करून ब्रह्मदेवाकडून शुक्राचार्यांच्या शिल्पविद्येचे संपूर्ण ज्ञान प्राप्त करून घेतले व साधनेही मिळवलो. असा रामायणांत उल्लेख आहे. प्राचीन भारतीय वास्तुविद्येंतील १८ आचार्यांत मय व शुक्राचार्य यांची गणना होते. रामायणांत विश्वकर्म्याचा जो उल्लेख आहे त्यावरून मय हा दक्षिण भारताचा शिल्पी होता आणि विश्वकर्मा हा उत्तर, पश्चिम, पूर्व भारताचा व लंकेचा शिल्पी होता. भारतीय वास्तुकलेंत जे शास्त्रीय शब्द आढळतात ते रामायणांतही आढळतात. 'स्थपति', 'वर्धकी' व 'तक्षक' हे शब्द भवन निर्माण करणाऱ्या कारागिरांच्यासाठीं रामायणांत आले आहेत.

राजमहालास प्रासाद, विमान, हर्म्य व सौध म्हणत. काहीं वर्णनांत या नांवांचा एकत्र उपयोग केलेला दिसतो. यावरून या प्रत्येक शब्दांचे अर्थ थोडेसे भिन्न असावेत. मजल्यांना भौम म्हणत. सप्तभौम, अष्टभौम असे अनेक मजली राजप्रासाद त्याकाळीं होते. प्रासादावर घुमट असत. एका विशिष्ट प्रकारच्या घुमटास विमान म्हणत. चुनेगच्चीस सौध म्हणत. सहस्रस्तंभी प्रासादांचे रामायणांत दोन ठिकाणीं उल्लेख आले आहेत घरांचे विविध आकारही रामायणांत वर्णिले आहेत. पद्म नांवाचें घर कमलाकार असे. ज्या घरास दरवाजा नसे त्यास स्वस्तिक म्हणत. ज्या घरास पूर्वेकडे दक्षिणेकडे दार नसे त्यास वर्धमान म्हणत. लंकेंत वज्र व अंकुशाच्या आकाराचीही घरें बनवलीं होती. घराच्या दरवाजावर तोरण असे. घरास अनेक चौक असत. खिडक्या झरोकेवजा असून त्यास सुंदर जाळी असे. छपराखालीं कबुतरें व इतर पक्ष्यांना रहाण्यासाठीं बनवलेल्या गवाक्षास 'विटंक', गच्चीवरील मुंडेरीस 'वलभी' आणि जिन्यास 'सोपान' म्हणत.

दशरथाचा राजवाडा पांच चौकांचा, रामाचा तीन चौकांचा, कौसल्येचा सात चौकांचा, सुग्रीवाचा सात चौकांचा असे वाड्यांचे वर्णन आहे. रावणाच्या राजकुटुंबाचे सर्व वाडे एकत्र होते त्यास 'आलय' म्हणत. त्या आलयाच्या मध्यभागीं रावणाचे राजभवन होते. त्या भवनास कैकप्रासाद होते. मुख्य प्रासादाची उंची कैकताल उंच असून तो हिमासारखा शुभ्र होता. त्या प्रासादाच्या गच्चीवर उभे राहूनच रावणानें रामाच्या सेनेचे निरिक्षण केलें होते. अशोक वनांतला रावणाचा प्रासाद गोलाकार, कैलासासारखा शुभ्र व गगनचुंबी होता. त्यास हजार खांब होते. याच प्रासादाचा एक सुवर्णखचीत खांब मारुतीनें उखडून राक्षसांना भिती वाटावी म्हणून गरगरा फिरवला होता. उत्तर कांडांत वर्णिलेले कुंभकर्णाचे भवन असेच वैभवशाली होते. एक योजने रुंद व दोन योजने लांब असा तो प्रासाद होता. स्फटि-

(पान २८ वेर पहा)



*अत्यंत सालस, सरळ, भावनाशील, भाबडी, सुंदर सुमित्रा अशा या मानवी मुग्ध कलिकेचं या वासनेच्या जगांत काय होणार ?— या जाणिवेनं माझ्या अंगावर शहारे येतात...*

# का ळ जी

म धु कु ळ क र्णी

माध्यमिक शाळेचें जग हें एक कोंवळें जग असतें. भावनेचें जग असतें. मानसशास्त्रांची पुस्तकं वाचूनहि इथले सगळे प्रश्न सुटतीलच असं नाहीं. हरतऱ्हेचीं मुलं, मुली इथं भेटतात. या सगळ्यांना समजून घेणं केवळ अशक्य आहे. त्यांतहि मग कांहीं प्रसंग येतात. कांहीं तक्रारी येतात, भांडणं येतात. एकेकाचे एकेक पैलू दिसतात आणि बालगुन्हेगारीचं शास्त्र किती व्यापक असेल याची कल्पना येते. त्याचबरोबर अगदीं सालस, सरळ, भाबडी मुलंहि मन आकर्षून घेतात—

दहावी क मधील सुमित्रा साने ज्यावेळीं प्रथम शाळेंत आली त्याचवेळेपासून तिच्याबद्दल मला सहानुभूति वाटूं लागली. कारण सुमित्रा एक अनाथ मुलगी आहे. तसं पाहिलं तर तिला वडील आहेत. सावत्र आईहि आहे. पण या सावत्र आईमुळंच तिला आपलं स्वतःचं घर मुकावं लागलं आहे. इथं ती एका दूरच्या मावशीकडे असते. तिचे वडील तिचें कांहींही पहात नाहीत. जवळ जवळ ती बाहेर हाकलल्यासारखीच आहे. म्हणूनच तिच्याबद्दल मला प्रथमपासूनच सहानुभूति वाटूं लागली. इथं या खेड्यांतल्या शाळेंत काय एकेक मुलं भेटतात ! निखालस खोटं बोलणारी, शिक्षकांनाहि शिव्या देणारी, चोऱ्या करणारी ! नववी ब मधला एक मुलगा तर परवा चक्क वगात दारू पिऊन आला होता !! आमचे विद्यार्थी बेजबाबदार आहेत कां ? आणि याला कारणीभूत कोण ? यासारख्या प्रश्नांच्या चिकित्सेंत न शिरतां या मुलांचे हे नाद सुटतील कसे या विवंचनेंत मी नेहमीं असतो—अर्थात सगळींच मुलं अशी बिघडलेली असतात असं मुळींच नाही. वर्तमानपत्रं विकून शिकणारा आठवींतला जोशी. एकुलता एक शर्ट रात्रीं धुऊन घालणारा दहावींतला जाधव. आणि आपल्या भांडीवालीचा, गेल्यावर्षीं सेंटरला पहिला येणारा मुलगा, कदम—या सगळ्या विविधतेंतून वाढतात. फक्त जबाबदाऱ्याच—मात्र सालस मुलांबद्दलची सहानुभूति द्विगुणित होते.

सुमित्रेबद्दलची आपुलकी म्हणूनच सुरवातीपासूनची त्या अतिशय देखण्या पण अनाथ मुलीवर माझें लक्ष होतें. पण तिच्या वर्गावर माझे तास नसत. त्यामुळें तिच्या बारीकसारीक हालचालींवर मला लक्ष ठेवतां येत नसे. असाच एकदां कुठल्या तरी शिक्षकांच्या गैरहजेरींत मी त्या वर्गावर गेलों होतो. मराठीच्या पुस्तकांतील 'एकच प्याल्यां'तील प्रवेश उघडला. आणि शिकविण्यास सुरवात केली. सुधाकराच्या निर्धाराचा तो प्रसंग होता. दारूला अगदीं स्पर्शहि न करण्याच्या त्याच्या मनाचा निर्धार प्रबळ करण्यासाठीं सिंधूची व घरादाराची अवस्था जास्त दारुण पण स्पष्ट करणें आवश्यक होतें. म्हणून मी सिंधूच्या अवस्थेचें वर्णन करूं लागलों.







एकेकाळची तिची श्रीमंती मी अगदीं खुलवून सांगितली. आणि नंतरची स्थिति सांगत असतांना मी गडकऱ्यांचेच सिंधूच्या तोंडचे शब्द मुलांच्यापुढें ठेवले. पोटांत कांहींहि नसल्यानें बाळापुरते दूधहि न येणारी सिंधू त्याला मांडीवर घेऊन दळत असते. बाळ भुकेनें कासावीस होऊन रडूं लागतो. त्यावेळीं ती म्हणते, " बाळा, राजसा, तुला भूक लागली कां रे ? काय करूं ? तुला असं कासावीस होऊन रडतांना पाहिलं कीं माझ्या मनाला मोह होतो. हें समोरचं पीठ आहे ना ? त्यांत थोडं पाणी घालून त्याचं पांढरं दूध करून तुला चालावं. पण, नाहीं रे राजसा, या पिटावरहि आपला हक्क नाहीं. तें लोकांचं आहे रे—" आणि हें सांगत असतांना सुमित्रा भर वर्गांत रडली ! अगदीं मुसमुसून रडली ! तिचा एकेक पैलू मला ज्ञात होऊं लागला—

सुमित्रा भावनाशील होती याचा मला आणखी एकदा अनुभव आला. वर्गांत डिबेटचा तास चालला होता. मी बाहेरून फिरत होतों. कानोसा घेतला. ' सिनेमा पहावा कीं न पहावा ' हा विषय होता. सुमित्रा बोलत होती. सांगत होती—कीं सिनेमा पाहूं नये. कारण त्याचा मनावर फार फार परिणाम होतो. एखादा सिनेमा पाहून आलं कीं त्या नायिकेप्रमाणेंच पातळ नेसावीत, तशा डिझाईनचेंच पोलके घालावें, तिच्यासारखं वागावं असं वाटतं—शिवाय पैसा खर्च होतो, पुन्हा त्याचंच व्यसन लागतं, वगैरे वगैरे—

आणि या भावनाशीलतेतून तिच्यांत आलेली रसिकता मला अभिनंदनीय वाटे. कारण अशा खेडवळ शाळेंत अशी रसिकता औषधालाच मिळायची. म्हणूनच या, खालीं पाहून चालणाऱ्या, सालस मुलीबद्दल मला कौतुक वाटे—

आणि एक दिवस मी असं कांहीं पाहिलं कीं माझा मींच सटपटलों ! शाळेंतील दोन तीन उनाड मुलं, शाळा सुटल्यानंतर पाठीमागच्या गॅलरींत उभी होती. त्यांचे कांहींतरी चाळे चालले होते. आणि समोरच्या इमारतीच्या गच्चीवर सुमित्रा उभी होती ! मी दिसल्याबरोबर मुलं पसार झाली. सुमित्राहि तात्काळ नाहींशी झाली—मी मात्र बेचैन झालों ! मुद्दाम सुमित्रेला ऑफिसमध्यें बोलावून विचारावें तरी पंचाईत. असे प्रसंग मोठे अवघड असतात—तेव्हापासून मी सुमित्रेची बारीक चौकशी सुरू केली—

अगदीं प्रथम मला एक शोध लागला. तो म्हणजे तिची जी दूरची मावशी आहे ती अगदीं असमंजस आहे. मला असंहि समजून आलं कीं आजूबाजूच्या लोकांशी बोलतांना अनैतिक विषयावर ती जरा शिथिलपणेंच संभाषण करते. अर्थात सुमित्रेच्या नादारीबद्दल ती एकदा आमच्या घरीं आली होती. त्यावेळीं सुमित्रेबद्दलचा आपुलकीचा भाव तिच्यांत दिसला. कारण हिला पातळ, पुस्तकं मीच घेणार असं तिनं सांगितलं. तिचा सगळा खर्च तीच करणार आहे. पण तिच्या घरचें वातावरण म्हणावें तसें निरोगी नाहीं. त्याच वाड्यांत वरच्या वर्गांतील दोन तीन मुलें खोल्या घेऊन रहतात. तीं मुलं कशी आहेत हें मला पक्कं माहिती आहे. त्या मुलांना मावशीच्या घरांत स्वयंपाक घरापर्यंत परवाना आहे. घरांत कांहीं गोडधोड केलं कीं- ही गोरीपान थुलथुलीत विधवा मावशी त्या मुलांना बोलावून-अगदीं आग्रहानं त्यांच्या हातावर ठेवते. त्यांनीं त्या पदार्थांची स्तुति केली कीं अरे, तो ' सुमी 'नं केलाय असं सांगून ही मावशी खस्याळ हसते. सुमित्रेवरून त्यांची पाचकळ थट्टासुद्धां करते ! नको त्या विषयांचें तोंडभरून चर्वण करणें हा तिचा छंद ! जणूं लैंगिक विषय त्या घरांतील कोनाड्याकोनाड्यांत खुंटीखुंटीवर बसलेले असतात. फक्त दारांत चांदीच्या पिंजऱ्यांत बांधलेला पोपटच नाहीं ! !—म्हणून मला सुमित्रेबद्दल वेगळीच काळजी वाटते—

एक दिवस सुमित्रा ऑफिसमध्यें कांहीं कामानिमित्त आली. ऑफिसमध्यें दुसरं कोणी नव्हतं. म्हणून मी तिला मुद्दामच विचारलं.

" काय सुमित्रा, अभ्यास कसा काय चाललाय् ? "

" ठीक आहे कीं, माझं गणित कच्चं आहे सर. म्हणून शेजारची दोन मुलं मला गणित शिकवतात. इतर विषयांची कांही काळजी नाहीं सर. "

मी एकदम आवाज चढवून म्हणालों,

" त्या मुलांच्याकडून तूं गणित शिकलीस तर तुला गणित कांहींसुद्धां येणार नाही. "

सुमित्रा एकदम गोरीमोरी झाली. काय समजायचें तें समजली. आणि मी मुद्दामच लगेच दुसऱ्या कामांत गुंतवल्याचें दाखविल्यानें निघून गेली—

त्या मुलांची गणिताची शिकवणी तिनं सोडली कीं नाही हें मला नक्की माहीत नाहीं. पण तिच्याबद्दल काळजी मात्र जास्त वाटूं लागली. कारण तशी सुमित्रा रूपानं चांगलीच आहे. गोऱ्यापान रंगाची, सडपातळ अंगलटीची, काळ्याभोर बोलक्या डोळ्यांची, तांबूस ओठाची, गुलाबी फुल्या फुल्यांचं पातळ नेसणारी सुमित्रा कुणाच्याहि मनाला मोह घालील अशीच आहे. मला पण एकच हुरहूर वाटूं लागली कीं या साध्यासुंदर मुलीला जगांत कुणीही फसवील. सहज फसवील. तिच्या आजूबाजूचं जग हीन पातळीचं आहे. सापळे लावून बसलं आहे. ही त्यांत केव्हां अडकेल हें सांगता येणार नाहीं—पण माझ्यापुढं अनंत प्रश्न उभे राहिले. मी हिच्यासाठीं काय करूं शकतो ? हिच्या आईवडिलांचा पत्ता नाहीं. पालक अचाट आहे. तेव्हां तिच्याकडे लक्ष द्यायला कुणाला सांगायचें ? मुख्याध्यापक म्हणून माझ्यावर कांही जबाबदारी असली तरी चोवीस तास मी तिच्याकडे कसा लक्ष देणार ? बाहेरच्या सगळ्या जाळ्यांना मी एकटा कसा आवरणार ? खरंच, मी सुमित्रेसाठीं काय करूं शकणार ? मला उगीचच वाटूं लागलं कीं मी लुळापांगळा आहे. दुबळा आहे. असमर्थ आहे—

वार्षिक परीक्षा संपली आणि सुमित्रा इंग्रजींत नापास झाली. मी तिला ऑफिसमध्यें बोलावून घेतलें आणि ताडताड बोललों. तिला जाणीव करून दिली कीं तुला अभ्यास चांगला केला पाहिजे. तुझे तुलाच श्रम घेतले पाहिजेत. मॅट्रिक होऊन पोटापाण्याची सोयहि तुझी तुलाच पाहिली पाहिजे. तुला दुसरं कुणी नाहीं आहे. तुला असं वागून चालणार नाहीं—

सुमित्रा ओक्साबोक्सी रडली. रडून रडून तिची सडपातळ आकृति तांबूसम्लान झाली. तरीही मी कटाक्षानं माझ्या आवाजांत सौम्यपणा जरासुद्धां आणला नाहीं—ओल्या डोळ्यांनीं खालीं मान घालून ती निघून गेली—

त्यानंतर आम्ही एकदां सहलीला गेलों होतों. सुमित्राही आली होती. सहलीमधलं वातावरण हें थोडसं मुक्त वातावरण असतं. वर्गांतली चाकोरींतली शिस्त इथं असत नाहीं. मी या सहलींत

अनुक्रमणिका






एकच पाहिलं कीं किती तरी मुलं सुमित्रेच्या जवळपास बसायला मिळावं, वावरायला मिळावं, बोलायला, विनोद करायला मिळावा म्हणून धडपडत होतीं. कित्येक मुलं तर तिच्यासाठीं सद्दलीला आली होती. अर्थात् हें मी जाणून होतों. अपेक्षून होतों. पण माझं लक्ष सुमित्रेकडं होतं. तिच्या प्रतिक्रियांकडे होतं. ती भिरभिरत्या नजरेनं, बावरलेल्या दृष्टीनं मुलांच्याकडं, त्यांच्या धडपडीकडं पहात होती. ही त्यांची धडपड तिला अगदीं हवीहवीशी वाटत होती कीं नाहीं हें नक्की सांगतां येणार नाहीं. पण ती स्थिर नव्हती, शांत नव्हती, थंड नव्हती—

मला कल्पना आहे कीं हें वयच मोठं विचित्र असतं. प्रत्येक नवीन अनुभव या वयांत हवाहवासा वाटतो. नि नको नकोसाहि वाटतो. मुलांची ती धडपड तिला हवीहवीशी वाटत होती. यांत तिचा फार मोठा दोष आहे असं मी तरी मानत नाहीं. आणि याबद्दल मला तिचा रागहि येत नाहीं. मला तिची कींव येते. आणि याचवेळीं दुसऱ्या बिलंदर मुली डोळ्यापुढं येतात. तिच्याच वर्गातली भोंडे. सगळ्यांना खेळवत असते. तिचा वाह्यातपणा अगदीं डोळ्यावर येत असला तरी तिच्यांतलें पुरुषी धारिष्ट्य वाखाणण्यासारखं आहे असं सुमित्रेकडं पाहिल्यावर तरी वाटतं. भोंडे कुणालाहि आहारी जाणारी नाहीं. तिच्या आहारी गेलेल्यांची, ती जन्मभर आठवणींत राहील अशी फजिती केल्याशिवाय राहणार नाही याची खात्री वाटते आणि मग या पार्श्वभूमीवर अत्यंत सालस, सरळ, भावनाशील, भाबड्या पण सुंदर सुमित्रेचं कसं व्हायचं याची जास्तच हुरहूर लागते—

आईबापांची मुलींना किती आवश्यकता असते हें मला यावेळीं प्रथम समजलं. आणि प्रत्यक्ष मुलगी कुठं राहते आहे, कशी राहते आहे याचो दिक्कत नसणारा बापहि जगांत असू शकतो हेंहि मला याचवेळीं प्रथम समजलें. मग एकेकदां सुमित्रेबद्दल विचार करीत असतां माझ्या मनाला वाटतं कीं शिक्षण वगैरे झक मारलं; सुमित्रेचं लग्नच करून टाकावं. अरे पण—माझ्या हातांत यांतलं काय आहे याचं भान राहत नाही. खरंच, सुमित्रेच्या बाबतींत आपल्या हातांत कांहींच नाही. तिच्या आजूबाजूचं जगच असं आहे, असं टपून बसलं आहे कीं कुठल्या क्षणाला या भावनाशील मुलीचा तोल जाईल, कुठल्या क्षणाला तिच पाऊल वाकड पडेल याचा नेम नाही. एकेक वेळीं असं वाटतं, असं वाटतं, कीं तिची थुलथुलीत आणि शिथिल मावशीच तिचा बळी घेईल!—खरंच, या मानवी मुग्ध कलिकेचं या वासनेच्या जगांत काय होणार?—या जणिवेनंच माझ्या अंगावर शहारे येतात——

म्हणून मी रोज अकरा वाजतां शाळेची घंटा झाली कीं सुमित्रेच्या वाटेकडे डोळे लावून बसतों. रोजच्या सारखा तिचा सोज्वळ, हंसतमुख चेहरा पाहिला कीं बरं वाटतं. माझा शाळेंतला वेळ आनंदांत जातो. पण साडेपांच वाजतां घंटा होऊन इतर मुलींबरोबर सुमित्रा घरीं निघाली कीं पुन्हां काळजी सुरूं होते. रात्री पडल्या पडल्या मणामणाचे दगड मनावर ठेवले जातात. मग मला झोपच लागत नाही. आणि क्षणाक्षणाला वाढणारी काळजी, वाढणारी हुरहूर मनाला बोचत असते, कीं हृणाच्या काळजाच्या या कोंवळ्या मुलीचं या उघड्या जगांत काय होणार! खरंच, सुमित्रेचं कसं होणार? • • •

*नको त्या वेळीं आगंतुक येणाऱ्या*
*पाहुण्यासारखा; पण हवा त्या वेळीं*
*अतोनात प्रयत्न करूनहिं*
*न उमटणाऱ्या...*

# खो क ल्या पा सू न खो क ल्या क डे

वायको आणि खोकला ! खूप साम्य आहे नाहीं ह्या दोन्हींत ? दोघांचेंहि स्थान आपल्या अगदीं जवळ-हृदयांत असतें. कधीं कधीं बायको डोक्यावर बसते तर खोकला मस्तकतिडिक उठवतो. बायकोचा रौद्रावतार पाहून पुरुष गर्भगळित होतो आणि खोकल्याच्या प्रतापानेंहि दे माय धरणी ठाय होतो. बायकोवर ताबा ठेवणें मोठी कठिण गोष्ट आहे. त्याचप्रमाणें खोकल्याला कबजांत राखणेंहि सोपे नाहीं. बायकोची लहर सांभाळतां सांभाळतां नवऱ्याची पुरेवाट होते तर खोकल्याची कदर बाळगतां बाळगतां नाकीं नऊ येतात. बायकोचा केव्हां तोल सुटेल याचा नेम नसतो—खोकल्याची उबळ केव्हां येईल हें कधीं सांगतां येत नाहीं. खरोखर बायको आणि खोकला दोन्हीं मोठ्या अजब गोष्टी आहेत.

आतां ह्या खोकल्याचेंच पाहा ना ! असा लहरी आहे ! ज्यावेळीं त्याची आवश्यकता असते त्यावेळेला बेटा विलकुल येत नाहीं. असा मिजासखोर बनतो कीं विचारूं नका. मनांतल्या मनांत आपण चरफडा, हात चोळत बसा, नाक डोळे फुगवा—पण ह्या बेट्यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं. एखादं प्रणयी युगल जशी आपली मिठी सोडायला तयार होत नाहीं तशी ह्याची अवस्था होते. हृदयाच्या कपारींतून तो कांहीं बाहेर येत नाहीं. आपल्या मालकावर केवढा बांका प्रसंग गुदरला आहे ह्याची कल्पनाच नसते मूर्खाला.

माझंच बघा ना उदाहरण म्हणून. कॉलेजांत होतों त्यावेळेस मी. असा अपटुडेट् पोषाख करून त्या दिवशीं गेलों होतों. कॉलेजांत ! बस् ! पांढरी शुभ्र सूटपॅंट, त्यावर निळा उलनचा कोट आणि फिकट हिरवा टॉय ! असं मॅचिंग जमलं होतं ! भांग चोपचोपून पाडला, वरच्या खिशांतून गुलाबी रुमाल डोकावूं लागला आणि बटन होलमध्यें गुलाबाचें फूल हंसूं लागलें. आरशांत परत परत पाहत होतों मी. दाढी अशी फाकडू झाली होती. गालावर स्नो चोळतां चोळतां विचार आला कीं आज मजा पाहा कॉलेजांत. साऱ्या पोरी नुसत्या बघत राहतील या पठ्याकडे—चोरून चोरून नि मंद स्मित करीत ! हा... हा . हा...!! अशा गोड विचारांत मी वर्गांत शिरलों. पण काय ! एका पोरीनं मान वर केली असेल तर शपथ. आमचे प्राध्यापक मारे रंगांत येऊन ज्यूलीयटच्या सौंदर्याचें वर्णन करीत होते नि सारेजण अगदीं ध्यानमग्न होऊन तें ऐकत होते. ह्या रोमिओकडे एकाचेंहि ( अन् एकीचेंहि ) लक्ष नव्हतें. मी मागचा मोक्याचा बाक गांठला. अजून थोडाफार धीर होता. मनांत म्हटलं...'हं आता घेतों साऱ्याचें लक्ष वेधून.' आणि खोकण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण तो बेटा रुसलेल्या प्रेयसीप्रमाणें आपल्या जागेवरून

**चन्द्रकांत इंदापूरकर**

बाहेर कांहीं येईना. पोटाला वळ्या पडल्या, तोंड चित्रविचित्र केलं, गळ्याला हात लावला पण तो चोर कांहीं बाहेर आला नाहीं. आणि अरेरे ! एका पोरीनें सुद्धां माझ्याकडे, माझ्या गुळगुळीत गालांकडे, गुलाबी रुमालाकडे नि हंसऱ्या गुलाबाकडे पाहिलें नाहीं. माझे सारे गुलाबी विचार मनांतच राहिले. तो खोकलाच कुठं गडप झाला ! मारे प्रयास करूनहि बेटा नाहींच आला.

नको त्या वेळेला मात्र ऐन भोजनाच्या वेळीं येणाऱ्या भटाप्रमाणें हा खोकला धावून येतो. त्या दिवशीं मी मंडईतून येत होतों. एका हातांत भाजीची पिशवी होती नि दुसऱ्या हातांत खराटा. बायकोनं बजाऊन सांगितलं होतं —'खराटा नाहीं आणला तर लक्षांत ठेवा. जेवायला वाढणार नाहीं. तस्सं परत पाठवीन.' तेव्हां नाइलाजानं तो घ्यावाच लागला. तशांत पावसाची थोडी रिमझिम सुरूं झाली. पिशवीला आंतील भाजीचें ओझें सहन झालें नसावें. कारण एक बंद जहाजाच्या शिडाप्रमाणें फडफडूं लागला. आंतील कांदे-बटाटे शाळेंतल्या खिडक्यांतून रस्त्यावरची मजा पाहणाऱ्या पोरांप्रमाणें बाहेर डोकावूं लागले. पिशवी कशीबशी सावरायला गेलों तर चपलेचा अंगठाच तुटला. तेव्हां भाजीच्या पिशवींतच दोन्ही चपलांना जागा करून देणें भाग पडलें. बऱ्याच प्रेमांत येऊन त्या लोचट कुत्र्याप्रमाणें मधून मधून कुपडे चाटीतच होत्या.

आणि याचवेळीं नेमकी आमच्या कॉलेजांतील लता शेळके कचकड्याच्या बाहुलीसारखी हातांतील रंगीत मुठीची लेडी छत्री उडवीत समोरून येत होती. मोठाच बांका प्रसंग आला होता मजवर. पिशवीचा बुरखा करून मी तोंड दडवण्याचा प्रयत्न करीत होतों. हातांतल्या खराट्याचाहि यासाठीं दुसऱ्या बाजूनें आधार घेत होतों. तिला चुकवण्याचा माझा यत्न असा सफळ होत होता. तोंच आकाशांतून अकस्मात् कोसळणाऱ्या विजेप्रमाणें खोकल्याची भली मोठी उबळ आली नि हातांतला खराटा दाणदिशीं उडून जवळून जाणाऱ्या लतावर आदळला.

'यू ब्लडी फूल!' करीत ती मागें पाहूं लागली. पिशवीच्या मागें तोंड लपविण्याची मी कसरत करूं लागलों. तोंच पिशवीच्या दुसऱ्या बंदानेंहि आपली नाराजी व्यक्त करून त्याचवेळीं आपला सत्याग्रही बाणा दाखवला आणि त्याचें फक्त एक टोंक काय तें माझ्या हातांत राहिलें. झालें! कांदेबटाटे रस्त्यावरच्या पाण्यांत पोरांप्रमाणें थुइथुइ नाचूं लागले. चपलांनीं जमिनीवर अंग टाकलें व त्यामुळें उडालेल्या चिखलानें माझें तोंड रंगून निघालें. लता माझ्याकडे पाहत हंसत होती. खोकला कांहीं माझ्यानें आवरला जात नव्हता. मनांतल्या मनांत त्याला शिव्याची लाखोली काय ती मी वाहत होतों.

असा हा खोकला बिलंदर आहे. माणसाला केव्हां झुकांडी देईल किंवा केव्हां त्याच्या बोकांडी बसेल हें कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. पण प्रयत्न केला तर त्याच्यावरहि ताबा मिळविणें अशक्य नाहीं. आणि कोणती गोष्ट साध्य होत नाहीं! प्रयत्न केला तर मंत्री परमिट देऊं शकतो. प्रयत्न केला तर सिनेनटी हां हां म्हणतां गळ्यांत हात घालूं शकते. प्रयत्न केला तर निवडणूकींत डिपॉझिट जत झाल्यावरहि राज्यपालै होतां येतें. मग प्रयत्न केला तर या दोन दमडीच्या खोकल्याला काबूंत आणतां येणार नाहीं काय? आणि एकदां कां याला काबूंत आणलें कीं कितीतरी गोष्टी आपल्या मनासारख्या घडवून आणतां येतात.

खरोखर ह्या खोकल्यासारखें उपयुक्त शस्त्र दुसरें कोणतेंच नाहीं. सध्यांच्या अहिंसक युगांत तर ह्याचा वापर करणें फारच इष्ट. कोणाला दुखापत करत नाहीं. कोणावर अत्याचार करीत नाहीं. शारीरिक तर नाहींच पण मानसिक सुद्धां त्रास देत नाहीं. कटुशब्दांप्रमाणें हृदयाला भेगा पाडण्याची करामत खोकल्याला करतां येत नाहीं प्रतिस्पर्ध्यांचा भेद न करतां त्याला पूर्णपणें गांगरून सोडणें आणि आपला कार्यभाग साधून घेणें फक्त ह्या एकमेव शस्त्राच्या साहय्यानें साध्य होऊं शकतें. साधनशुचितेच्या काळांत अशा शस्त्राची आणखी कोणती महती वर्णन करावी? बरं, हें शस्त्र बाळगण्यासाठीं मोठा कडेकोट बंदोबस्त आवश्यक नसतो. कारण प्रत्येकाच्या हृदयांतच त्याचें निवासस्थान असतें. त्याचा वापर करण्यासाठीं फार मोठ्या शिक्षणाची जरूरी नसते. थोड्याशा युक्तीनें त्याला काबूंत ठेवतां आलें कीं संपलें. बालापासून वृद्धापर्यंत कोणीहि व कोणत्याहि वेळेला त्याचा सहज उपयोग करूं शकतो.

या शस्त्राचे प्रकार तीन आहेत. खाकरणें, नेहमींचें साधें खोकणें व उबळ येणें. खांकरणें हा छोट्याशा खंजिराप्रमाणें आहे. ह्याचा उपयोग अत्यंत जपून व अगदीं मोक्याच्या वेळीं करावयाचा असतो. विशेषतः प्रेमाच्या रणांगणांत सावधगिरीनें उपयोग केल्यास उभयपक्षाला ह्याचा फायदा मिळण्याचा संभव असतो. खांकरतांना बेडकासारखा आपला आवाज येणार नाहीं ह्याची मात्र काळजी घेतली पाहिजे. बसस्टॉपवर कट्ट्याला टेकून रुबाबांत सिगरेट ओढत किंवा आगगाडींत गर्दीच्या वेळीं आपल्याजवळ भरपूर जागा असतांना ह्या अस्त्राचा उपयोग केला कीं निम्मी लढाई जिंकली जाते. कोणत्याहि गोष्टीची प्रस्तावना करणें कठीण असतें. विशेषतः प्रेमांत पडण्यापूर्वीं ओळख कशी करून घ्यावी ह्याचें कोडें अनेकांना पडतें व तें सुटण्यापूर्वींच त्यांचें प्रेम करण्याचें वय निघून गेलेलें असतें. तेव्हां अशा भांबावलेल्या युवकांनीं आणि युवतींनीं ह्या शस्त्राचा प्रयोग करून पाहण्यासारखा आहे. खंजिराप्रमाणेंच हें शस्त्र थेट हृदयाला जाऊन भिडतें. पण खंजीरानें माणूस घायाळ होतो तर ह्यानें हृदयांत गुदगुल्या होतात. हृदय हृदयाशीं जाऊन मिळतें. प्रेमाच्या प्रांगणांत पुढें पावलें टाकण्यास ही नाजूक प्रस्तावना फारच उपयोगी पडतें.

नेहमींचें साधें खोकणें खांकरण्याची पुढची पायरी आहे. ह्याचा चतुरपणें उपयोग केला तर आपलें 'इंप्रेशन' इतरांवर चांगलेंच मारतां येते. आगगाडींत बसलों असतांना, मधूनच 'हुश्श्' करावें. हातांतल्या वर्तमानपत्रानें वारा घेतल्यासारखा करावा, हळूच चोरट्या नजरेनें अंवतीभोंवती पाहून 'इंप्रेशन' मारण्यासारखं पांखरूं जवळ बसलं आहे ह्याची खात्री करून घ्यावी. मग जरा खांकरून पहावें. नजरेला नजर एकदोनदां भिडून जाते. नंतर हळूच छातीला हात लावावा. तोच हात पुढें तोंडापाशीं नेऊन खांकरल्यासारखें करावें. दुसऱ्या हातानें सेंट लावलेला रेशमी रुमाल बाहेर काढावा. तोंड पुसल्यासारखें करावें व परत मंद मंद खोकावें. सहज डोळ्याच्या कोपरांतून बाहेर पहावें. बहुधा ती नजर आपल्याकडेच लागलेली असते. मग हळूंच विचारावें—

'हा हवेंत बदल अगदीं अचानक झाला नाहीं?'

'नाहीं तर काय बाई!' मान हलवीत व तोंडावर रुमाल फिरवीत उत्तर येते.

'सर्दी खोकला कसा झटकन् येतो!' परत बळेंच खोकत म्हणावें.

'हो ना बाई! मलासुद्धां हा मेला खोकला झालाय!' बळेंच आणलेल्या खोकल्यासह प्रत्युत्तर येतें.

आणि मग खोकल्यावरून रुमालावर, रुमालावरून सेंटवर, सेंटवरून फुलांवर, मग कॉलेजवर आणि नाना विषयांवर, भराभर रूळ बदलणाऱ्या गाडीप्रमाणें गप्पा बदलत जातात—रंगत जातात.

व्याख्यान देतांना वक्त्यालाहि ह्या शस्त्राचा उपयोग करतां येतो. विषयाची पुंजी संपलेली असली व खरोखरच बोलायला कांहींहि शब्द शिल्लक नसले म्हणजे जरासें हंसून 'आतां आपला बराच वेळ घेतला, कंटाळा आला असेल नाहीं आपलाला?' असें म्हणून रुमाल तोंडाशीं धरत जरासें खोकावें, पाण्याचा प्याला घेऊन तोंडाला लावल्यासारखा करावा. श्रोत्यांवर लगेच केवढा प्रभाव पडतो! खरोखरच केवढे प्रयास घेऊन बिचारा बोलत आहे ह्याची त्यांना तत्काळ कल्पना येते. खिशांतल्या कांद्याबटाट्यांचा

प्रसाद वक्त्याला देण्याचें भानहि त्यांना राहात नाहीं उलट वक्त्याबद्दल दया आणि सहानुभूति वाटते. फुकट रुबाब दाखवण्यासाठीं अशा-प्रकारें ह्या अस्त्राचा फार छान उपयोग होतो. म्हणूनच आपल्या कनिष्ठांना सूचना देतांना वरीष्ठ अधिकारी किंवा विद्यार्थ्यांपुढें बोल-तांना-शिक्षक ह्याचा प्रसंगानुरूप उपयोग करतात.

उबळ येणें ही खोकल्याची प्रगत अवस्था होय. विशेषतः स्वतःवर एकादी गोष्ट येऊन बेतली कीं याचा उपयोग करणें फायदेशीर होतें. शाळेंत विद्यार्थी जातो. मास्तर क्रुद्ध मुद्रेनें विचारतात—'काल सांगितलेलीं पंच-वीस उदाहरणं केलीं कीं नाहीं? त्याच्या मनांत विचार येतो—'मास्तरनं तरी कधीं एवढीं आपल्या आयुष्यांत केलीं होतीं कां? शाळेंत उदाहरणं, घरीं उदाहरणं, सगळीकडे उदाहरणं मग खेळायचं कधीं? पतंग केव्हां उडवायचा!'

'अहो बघतां काय शुंभासारखं? गणितं केलीं कीं नाहीं?' मास्तर गरजतात.

'अं...अं...अं!'

'अं—अं काय चाललंय? उदाहरणं कुठं आहेत?'

'सर मी कणि...मी कणि...'

'हं! हं! पुढं बोल.'

'मी कणि...खो खो...ओ ओ—ओयू ओए...खोक् खोक्.....आणि ह्या तीव्र ढासेपुढें बिचारे मास्तर गांगरून जातात. त्यांचा रुद्रावतार नाहींसा होतो. पोराच्या पांठीवरून हात फिरवीत ते म्हणतात—'खोकला झालाय रे तुला.'

'खोक्...खोक् ऽऽ. खोक् ऽऽ......हो सर...खोक् आईय ग—सर आई...खोक्... म्हणत होतो खोक् ऽऽऽ डांग्या ऽऽ डांग्या झालाय. खोक् ऽऽ,ऽ...'

'बरं! बरं! आधीं नाहीं कां सांगू? आधीं चांगलं बरं वाटूं दे मग अभ्यास कर हं!'

अशा प्रकारें ऐन आणीबाणीच्या वेळीं हा खोकला मोठा ज्वलंत होऊन आपल्या मदतीला येतो. ह्याच्या रौद्र स्वरूपापुढें मग कोणाचें चालत नाहीं. ह्याच्यापुढें महा कजाग बायको गोगलगाय बनते तर भला करडा अधिकारी अगदीं सुतासारखा मऊ बनतो. डोळ्यांतले विस्तवाचे निखारे कोळशाप्रमाणें काळे ठिक्कर करण्याची किमया फक्त ह्या महाभयंकर उबळींत आहे. एकदां कां मोठा 'ओयू' करून बेंबीपासून किंकाळी फोडली कीं, सारे पोट अस्ताव्यस्त हलवलें, डोकें गरगरा फिरवलें व विचित्र हातवारे करीत कंठांतून खोक् खोक्चा भिन्न सुरांतील ध्वनि एकदोन मिनिटें सतत चालू ठेवला कीं समोर महाजगदंबा असो कीं रुद्राचा कडक अवतार असो—त्याचीसुद्धां क्षणार्धांत गाळण उडून जाते व आपल्या पायावर लगेच ते नत-मस्तक होतात.

ह्या शस्त्राचा असा तिहेरी उपयोग करतां येतो. थोड्याशा कष्टानें ही गोष्ट सहज शक्य होते. लहानपणापासून ह्याचा वापर करतां आला पाहिजे. त्यापासून शरीराच्या सर्वांगाला चांगलाच व्यायाम मिळतो. पायाच्या बोटां-पासून तो डोक्याच्या केसापर्यंत सर्व अवयव गदागदा एकाचवेळीं हलवण्याचें सामर्थ्य फक्त खोकल्यांतच काय तें आहे. आवाजाची लयबद्धता आणि शरीराची लवचिकता केवळ ह्याच व्यायामानें प्राप्त होऊं शकते. बालांना आणि वृद्धांना, स्त्रियांना आणि पुरुषांना हा व्यायाम घेऊन आपलें शरीर व मन जिवंत ठेवतां येते. किंबहुना जिवंत असण्याची खूण खोकला हीच आहे.

आमच्या कांहीं आधुनिक डॉक्टरांच्या मतानें रडण्यापेक्षां सुद्धां खोकणें हेंच जास्त स्वाभाविक आहे. त्यांनीं सुद्धां कांहीं प्रयोग चालू ठेवले आहेत. ते यशस्वी झाले तर मूल जन्मतांना रडण्याऐवजीं खोकायलाच सुरवात करील. म्हणजे माणूस खोकत खोकतच जन्मणार व खोकत खोकतच मरणार. मग आमचा एकादा नवकवि मानवी जीवनाचं सार थोडक्यांत असें सांगेल—

> 'मानवी जीवनाचं सार, गडे
> खोकल्यापासून खोकल्याकडे!'



(पान २२ वरून चालू)

काचे व सोन्याचे खांब, सुंदर जिने, हस्तिदंती तोरण, हिरे व स्फटिक यांचे चौथरे असे या कुंभकर्णाच्या प्रासादाचें वर्णन आहे. कोणत्याही ऋतूंत राहाण्यास त्यांत आनंद वाटे. याशिवाय यज्ञशाला, अग्निशाला, यासारख्या धर्माचरणासाठीं बनवल्या जाणाऱ्या वास्तूंचाहि उल्लेख पहायला मिळतो. दशरथाच्या अश्वमेध यज्ञांत १८–१८ विटाच्या सहा गरुडावर वेदी बनवल्या होत्या.

प्रासाद निर्मितीप्रमाणेंच उद्यान निर्मिती-चीहि कला रामायणकालांत अस्तित्वांत होती. विशेषतः अशोकवनाचे वाल्मिकीनें केलेलें वर्णन फारच बहारीचें आहे. नाग, अशोक, चंपक, चंदन, आम्र अशा विविध तऱ्हेच्या सुंदर वृक्षांनीं ती वाटिका शोभत होती. वृक्ष फळाफुलांनीं बहरले होते. वृक्षावर मधूर पक्ष्यांचे गायन चालू असे. वाटिकेंत मस्त मृग वावरत होते. वृक्षाखालीं चौथरे होते. वाटिकेच्या चौरी बाजूस कोट होता. वाटिकेंत विविध आकारांच्या पुष्करिणी होत्या. त्यांत हंस व सारस क्रीडा करीत होते. पुष्करणींत सुंदर कमळें फुलली होती. पुष्करणींचे तळ स्फटिकाचे होते. आणि भोंवताली वाळूऐवजीं मोती व प्रवाळ पसरले होते. या वाटिकेंतून एक नदी वहात होती. उंच शिखराचा एक पर्वतही त्या वाटिकेंत होता. त्यांतून शीतल जलाचे झरे उड्या घेत होते. ठिकठिकाणीं दगडी गुंफा होत्या आणि बसण्यासाठीं ओटे होते.

> नन्दनं विबुधोद्यानं चित्र चैत्ररथं यथा ।
> अतिवृत्तमिवाचिन्त्यं दिव्यं रम्याश्रिया युतम् ॥

सुगंधानी व सुरसांनी युक्त अशी ती वाटिका देवतांचे नंदनवन किंवा कुबेराच्या चित्ररथाप्रमाणें वाटे.

रामायण हे काव्य आहे, इतिहास नव्हे. अर्थात् सत्याला कविकल्पनेचा साज चढवला असण्याची त्यांत शक्यता आहे. तरी पण कल्पित गोष्टींनाही सत्याचा पाया असावाच लागतो. त्या दृष्टीनें रामायणांतल्या अतिशयोक्तीचा भाग वगळला तरी त्यातल्या वर्णनावरून त्याकाळांतही ललितकलांचें स्वरूप विलोभनीय होते याची खात्री पटते.












## एक पानी कथा

# नाईटडयूटी

रात्रीं साधारण दीड दोनचा सुमार असावा. रस्त्याच्या या टोकापासून त्या टोकापर्यन्त एव्हांनां हवालदार यादवाच्या तीन चकरा मारून झाल्या होत्या. नेहमीच्या विश्रांतीच्या हप्त्याची वेळ झाली होती.

थोडासा आराम करण्यासाठीं तो 'लिबर्टी क्लॉथ स्टोअर्स'च्या पायरीवर बसला. डाव्या खिशांतून विडी आणि उजव्या खिशांतनं काड्याची पेटी काढली. विडी पेटवून त्यानं एक मस्त झुरका घेतला आणि ओटांतनं हळूंहळूं धूर बाहेर सोडायला सुरवात केली.

तोंडांतला सगळा धूर बाहेर येण्यापूर्वीच कुठून तरी कुणीं 'धांवा, सोडवा होऽ" असं ओरडल्याचं त्याच्या कानांवर आलं ! कुणातरी बाईचा आवाज वाटत होता. हवालदार यादव ताडकन् उभा राहिला. त्यानं हातांतली विडी फेंकून दिली, दंडूका सांवरला आणि आवाज नक्की कुठनं आला तें पाहूं लागला.

'लिबर्टी क्लॉथ स्टोअर्स' नंतर तीन दुकानं सोडून उजव्या बाजूला एक छोटीशी गल्ली होती. तिकडूनच—त्या गल्लींतूनच आवाज आला होता. हवालदार यादव धांवतच त्या गल्लीकडं गेला. गल्लीच्या आंतल्या बाजूला चारपांच धटिंगण एका बाईशीं दंगामस्ती करण्याचा प्रयत्न करीत होते. चार पांच गुंडापुढं बिचारी एकटी बाई काय करणार ! ती जोरानं ओरडायचा प्रयत्न करीत होती. पण एकानं तिच्या तोंडावरच हात दाबून ठेवल्यानं तिला ओरडतांहि येत नव्हतं.

हवालदार यादवाचं रक्त तें दृश्य पाहतांच डोक्यापर्यंत चढलं ! त्यानं एकदम चाल केली नि आपला दंडूका एका गुंडाच्या टाळक्यांत हाणला. डाव्या हातानं खिशां-तली शिटी काढून फुंकली. तेवढ्यांत आणखी दोघांना त्यानं दंडुक्याचें रट्टे दिले.

हवालदाराचा रुद्रावतार पाहतांच नि त्याच्या शिटीचा आवाज ऐकतांच गुंड पार पळून गेले. त्यानं त्या बाईकडं पाहिलं. ती आपला चेहरा दोन्हीं हातांनीं झांकून घेऊन थरथरत उभी होती.

"बाई आतां घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं. कोण तुम्ही ? अशा रात्रीच्यावेळीं अशा एकट्यादुकट्या कां फिरत आहा ?" त्यानं समजावणीच्या स्वरांत विचारलं.

बाईनं तोंडावरचें हात काढले. ती अति-शयच देखणी होती. तिचं रूप पाहतांच ब्रह्मचारी हवालदार यादव गारेगार झाला. ती बाई हुंदके देत देतच म्हणाली,

"मी आणि माझे म्हातारे बाबा आम्ही दोघंच त्या टोंकाला खोपटांत राहतो. बाबांना दम्याचा विकार आहे. आज रात्रीं त्यांचा श्वास अगदींच कोंडला. मला त्यांची अवस्था पाहवेना. मी डॉक्टरला बोलवायला जात होते तो वाटेंत या गुंडानीं घेरलं. तुम्ही वेळेवर आलांत म्हणून बरं ! नाहीतर...!" अन् ती अधिकच रडूं लागली.

"बरं बरं बाई, आतां रडूं नका, मी तुम्हांला घरीं पोंचवीन. पण तुमच्याकडं डॉक्टरला द्यायला पैसे आहेत कां ?" तिच्या अंगावरच्या जुनाट फाटक्या कपड्या-कडं पहात हवालदारानं विचारलं.

"नाहींत" अशा अर्थी तिनं फक्त मान हलवली.

"मग यावेळीं कुठला डॉक्टर येईल तुमच्याबरोबर ! असं करा हे वीस रुपये घ्या तुम्हांला...!" हवालदारानं खिशांतल्या दहाच्या दोन नोटा देत म्हटलं, "आतां माझ्यापाशीहि एवढेंच आहेत !"

तिनं पैसे घ्यायचं नाकारलं ! पण हवाल-दार यादवानं तिला तें घ्यायलाच लावले.

तिच्या डोळ्यांतले कृतज्ञतेचे अश्रु पाहून, हवालदार यादवाला आपलं जीवन सार्थकी लागल्यासारखं वाटलं.

"चला मी तुम्हांला पोंचवून देतो" तो म्हणाला.

"नको, कशाला तुम्हांला उगीच त्रास ! जाईन मी एकटी !" "पण कां हं इथं तुमची रोज नाईट ड्यूटी असते कां ?" तिनं विचारलं !

"नाही, रोज नाही. कधीं कधीं !" यादव म्हणाला.

"उद्यां आहे का ?" तिनं पुन्हां विचारलं.

"नाहीं. उद्यां तर मला सबंध सुट्टी आहे ! पण कां ?" यादवानं सहज विचारलं.

"कांहीं नाहीं. उगीच विचारलं !" ती म्हणाली नि यादवाकडं एक कटाक्ष टाकून निघून गेली.

यादव तिचा विचार करीत तिथं कितीतरी वेळ उभा होता.

दुपारीं तो झोंपून उठला तोंच इन्स्पेक्टर-साहेबांकडून त्याला बोलावणं आलं. तो ऑफिसांत गेल्यावर त्याला कळलं कीं आजे ज्याची रात्रपाळीं होती तो हवालदार दळवी अचानक फार आजारी पडलाय् ! त्याच्या-ऐवजी आज जादा काम म्हणून यादवालाच पुन्हां नाईट ड्यूटीला जायचं होतं !

जादा काम असूनदेखिल यादव आनंदानं नाईटड्युटीवर गेला.

तीन चकरा मारून झाल्यावर तो 'लिबर्टी क्लॉथ स्टोअर्स'च्या पायरीवर बसला. त्यानं चौथी विडी पेटवली व झुरका घेतला. कालची आठवण येत होती त्याला. इतक्यांत 'धांवा—सोडवा' अशी किंकाळी ऐकू आली.

त्यानं विडी फेकली नि दंडुका सांवरला—धांवत तो उजव्या गल्लींत शिरला. चारपांच धटिंगण एका बाईशीं दंगामस्ती करण्याचा प्रयत्न करीत होते. एकानं आपला हात त्या बाईच्या तोंडावर दाबून धरला असल्यानं तिला ओरडतांहि येत नव्हतं !

यादवानं दंडुक्याचा प्रहार एका गुंडाच्या टाळक्यावर केला नि डाव्या हातानं शिटी काढून फुंकली.

हवालदाराचा रुद्रावतार पाहून नि त्याच्या शिटीचा आवाज ऐकून गुंड पळून गेले.

तोंडावर दोन्हीं हात घेऊन ती बाई थरथरत उभी होती.

"बाई आतां घाबरण्याचं कारण नाहीं. कोण तुम्ही ?" त्यानं समजावणीच्या स्वरांत विचारलं.

बाईनं तोंडावरचें हात काढले.

त्या देखण्या बाईचा चेहरा पाहतांच हवालदार यादवाच्या डोक्यावर आभाळ कोसळल्याचा भास झाला. यादवाचा थिजून बर्फ झाला.

ती 'कालचीच' बाई होती ! ●●●

**श्रीकान्त रानडे**











चित्रकार आणि लेखक

**दत्तात्रय गणेश गोडसे**

पोत म्हणजे, त्याचे घटक कोणते, पोत घडवून यंत्रणा व तिच्या उत्क्रांतीतील निरनिराळ्या अवस्था कोणत्या यांचा विचार गेल्या लेखांत झाला. छद्दंत जातकाचे निरनिराळे आविष्कार तपासून पोतासंबंधी केलेले विवेचन कितपत सुसंगत ठरते हे पडताळून पहाण्यापूर्वी, छद्दंत जातकाची कथा व तिचा कथानायक हत्ती, याविषयीं अधिक विस्तारानें या लेखांत विचार करण्यांत आला आहे.

## २ : कुंजरो छब्बिसाणो........

छद्दंत जातकाच्या निरनिराळ्या शिल्पचित्रांकित आविष्कारांचे पोत तपासण्यापूर्वी छद्दंत जातकाच्या कथेविषयीं अधिक विचार करणें आवश्यक आहे. आज उपलब्ध असलेल्या जातक संग्रहांतील क्रमांक ५१४ जातककथा म्हणजे छद्दंत जातककथा होय.

जातककथांची भाषा पाली खरी; परंतु या कथांचा मूळ पालीग्रंथ आज उपलब्ध नाहीं. या जातककथांवरील " जातकअट्ठ कथा " या नांवाच्या टीकात्मक ग्रंथाचे इ. स.च्या पांचव्या शतकापूर्वी सिलोनमध्यें सिंहली भाषेंत भाषांतर झालें होतें. हें भाषांतर नक्की केव्हां झालें होतें हें निश्चित नाहीं. या सिंहली ग्रंथाचें, बहुधा ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकांत, " ज्ञातकअट्ठ वण्णन " (जातकार्थ वर्णन) या नांवानें पुन्हां पालीमध्यें भाषांतर करण्यांत आलें व सिंहली भाषेंत गेलेल्या पालीजातककथा अशा द्राविडी प्राणायामानें परत पालींत आल्या. हें पाली भाषांतरच ह्वी. फॉसबोर्ल या डॅनिश विद्वानानें संपादन करून जगासमोर मांडले व या ग्रंथाच्या भाषांतररूपानेंच जातककथांचा आज सर्वत्र प्रसार झाला आहे. आज उपलब्ध असलेल्या जातककथा म्हणजे सिंहली भाषांतराचें परत पाली भाषांतर होय हें लक्षांत ठेवले पाहिजे.

हरिदासाच्या आख्यानाप्रमाणें पालीतील मूळ जातककथांतून मधून मधून पद्यरचना केलेली आढळते. या पद्यांना गाथा म्हणतात. ह्या गाथा जातककथांतील अतिप्राचीन व महत्त्वाचा भाग होत. मौखिक परंपरेनें गाथांचा हा पद्यात्मक अलिखित भाग पिढ्यान्‌पिढ्या जतन करून ठेवण्यांत आला होता, व या गाथांचें गद्यांत स्पष्टीकरण करून त्यांचा अर्थ आजच्या हरिदासाच्या कथेप्रमाणें विस्तारानें सांगण्यांत येई. या पद्धतीमुळें जातकांतील मूळ गाथा, बदल न होता मूळ स्वरूपांतच राहिल्या व त्यांच्या स्पष्टीकरणाचा गद्यात्मक टीकेचा भाग कथा सांगणाऱ्या बरहुकूम बदलत गेला. म्हणजेच गाथांच्या स्पष्टीकरणाच्या गद्यभागाचा विस्तार अथवा संक्षेप स्थितिकाल सापेक्षतेनें बदलत राहिला. सिलोनमध्यें-सिंहलींत झालेल्या उपरिनिर्दिष्ट भाषांतरांतही, भाषांतरकारानें मूळगाथा पालींतच जश्याच्या तश्या ठेवल्या होत्या व त्यावरील गद्यटीका विस्ताराचेंच भाषांतर सिंहलींत केलें होते. जातकांतील गाथांची भाषा









अनुक्रमणिका

गद्याच्या भाषेपेक्षां प्राचीन दिसते याचें कारण भाषांतराच्या प्रक्रियेंत तिच्या मूळ पाली स्वरूपाला कोठेंच धक्का लागला नाहीं हें होय. प्रस्तुत छंदांत जातकांतील पद्य व गद्य यांच्या स्वरूपांत हाच फरक आहे. पालीपद्य प्राचीन आहे तर गद्याचें स्वरूप सिंहलींतून पालींत भाषांतर होण्याच्या काळचें आहे; म्हणजेच गद्य भाग हा पांचव्या शतकांतील गद्याच्या स्वरूपाचा आहे तर पद्याचें स्वरूप मूळ पाली पद्याचे, म्हणजे इ. स. पूर्व तिसऱ्या शतकांतील अथवा त्याही पूर्वीच्या पद्याचे आहे.

कथेंतील गाथा संगीताच्या साथीबरोबर गायिल्या जात. पद्यें संगीताच्या साथीवर गाण्याची प्रथा भारतांत फार प्राचीन काळापासून आहे. आजही आदिवासी जमातींच्या लोककथांतील पद्यें गायिलीं जातात, येवढेंच नव्हें तर गातांना हावभावांसकट पद्यांतील भावनांचा आविष्कार प्रकट करण्यांत येतो. एका जमातींतील कथा जेव्हां दुसऱ्या जमातींत जाते तेव्हां ती मूळपद्यें व त्यांचे संगीत यांच्या सह जाते. मध्यभारतांतील मंडलागोंड व संथाल यांच्या लोककथांतील पद्यें व त्यांचे संगीत यांचे स्वरूप पाहिल्यावर वरील विधानांतील सत्यता पटेल.

भगवान बुद्ध, पूर्वींच्या अनेक जन्मीं बोधिसत्व असतांना घडलेल्या ह्या कथा आहेत म्हणून या कथांना "जातककथा" असें म्हणण्यांत येते. बोधि म्हणजे लोककल्याणाच्या तत्त्वाचें श्रेष्ठतम ज्ञान, कीं ज्या ज्ञानानेंच निर्वाणाची प्राप्ति होऊन पुनर्जन्म रहात नाहीं. तें ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं जो प्राणी धडपडतो तो बोधिसत्व. गौतमबुद्धाला बोद्धि प्राप्त करून घेण्यासाठीं अनेक जन्म घ्यावे लागले. या प्रत्येक जन्मीं तो साधक होता व या साधकावस्थेंतच त्याला "बोधिसत्व" असे संबोधण्यांत येतें. बोधिसत्वाच्या या निरनिराळ्या जन्माच्या कथा म्हणजेच प्रस्तुत जातककथा होत.

या कथांपैकीं बऱ्याचशा जातककथा मूळच्या बुद्धपूर्वकाळांतील अतिप्राचीन भारतीय लोककथाच होत्या. बुद्धपूर्वकालापासून प्रचलित असलेल्या अनेक लोकप्रिय कथांतून बौद्धधर्मीयांनीं कांहीं कथांची निवड केली व स्वधर्मप्रचारास्तव त्यांना प्रस्तुत जातककथांचें बौद्धस्वरूप दिलें. तत्कालीन भारतीय जनसमूहास ह्या प्राचीन भारतीय लोककथा अनेक अर्थांनीं महत्त्वाच्या वाटत होत्या. बहुजन समाजांत त्या लोकप्रिय व सर्वमान्य होत्या, एवढेंच नव्हे तर तत्कालीन लोकसाहित्याचा त्या एक महत्त्वाचा भाग होत्या. मौखिक परंपरेनें अनेक पिढ्या जतन करून ठेवलेल्या पूर्वापार लोकवाङ्मयाचा त्या अक्षरसंचय होत्या. समाजाच्या पराक्रमी गतेतिहासाचे, भोळ्या श्रद्धासमजुतींचे, भाबड्या आशाआकांक्षांचे संचित सांठविलेल्या त्या मंजुषा होत्या. या कथांतील महत्त्वाचीं पात्रें, घटना अथवा प्रसंग यांची ओळख समाजांतील आबालवृद्धांना होती. एवढेंच नव्हे तर त्यांनीं निर्माण केलेल्या सर्व निष्ठांचे, संकेतांचे व मूल्यांचे आदर्श हेंच पर्यायानें तत्कालीन व्यक्तिजीवनाचे व समाजधारणेचे अलिखित आदर्श होते. बहुजनसमाजाचें या कथांवर विलक्षण प्रेम होतें. त्याप्रमाणेंच समाजमनावरही या कथांची विलक्षण पकड होती. ह्या कथांचा हा लोकविलक्षण प्रभाव लक्षांत घेतल्यामुळेंच बौद्धधर्मीयांना धर्मशिक्षणाच्या नव्या प्रकाशांत या जुन्या कथांनांच नवे पोशाख देऊन आपल्या धार्मिक वाङ्मयांत समाविष्ट करून घेणें भाग पडले. आदिमानवापासून तों आजपर्यंत मनुष्याला कथेचे वेड आहे. गोष्टीवेल्हाळ मानवाच्या इतिहासांत कथावाङ्मय हें नेहमींच प्रचाराचें समर्थ साधन ठरलें आहे. जगांतील सर्व धर्मप्रचारकांनीं, स्वमतप्रतिपादनार्थ अभावितपणें अथवा बुद्धिपुरस्सर कथा-वाङ्मयाची कांस धरली आहे. बुद्धपूर्वकाळांत वैदिक धर्मीयांनीं देवासुरांच्या गोष्टी सांगून, कथाच सांगितल्या होत्या; निरनिराळ्या रूपकथांच्या रूपानें उपनिषद्कारांसारख्या तत्त्वज्ञांनीही अखेर गोष्टी गोष्टीच सांगितल्या; आणि प्रथम कथावाङ्मयाला निषिद्ध मानणाऱ्या बौद्धांनाही बहुजनसमाजाचें मन वळविण्याकरितां अखेर लोककथांनाच हाताशीं धरावें लागले. "तथागतांचा" संदेश "नाना धातुकोटि लोको" अशा समाजांतील सर्वथरांपर्यंत पोहोचविण्याच्या दृष्टीनें बौद्धांनीं लोककथांचा आश्रय घेणें अगदीं अपरिहार्य होतें. किंबहुना बहुजन हिताय, बहुजन सुखाय असण्याचें ब्रीदवाक्य असलेल्या या नव्या अवैदिक पंथानें निरनिराळ्या जीवननिष्ठांचा आदेश देणाऱ्या लोककथांना हाताशीं धरणें कर्तव्य प्राप्तच होतें.

जातककथांकरितां बौद्ध सांप्रदायिकांनीं एक "योजनाबंध" तयार केला होता. प्रत्येक जातक कथा या बंधांत व्यवस्थित बसविण्यांत आली आहे. मुद्दाम रचलेल्या नवकथा तर या योजनेंत व्यवस्थितपणें बसविण्यांत आल्या होत्याच, परंतु धर्मप्रचारास्तव पंथांत घेतलेल्या बुद्धपूर्व प्राचीन लोकप्रिय लोकथाही या योजनेंत सुसंगतपणें बसवून त्यांनां जातककथांचे पंथीय स्वरूप देण्यांत आले होते. जातककथेच्या या बंधाचे, प्रत्युत्पन्नवत्थु, अतीतवत्थु, गाथा वेय्याकरण व समोधान असे निरनिराळे भाग असतात. प्रत्युत्पन्नवत्थु हा भाग प्रस्तावनात्मक व प्रासंगिक असतो. "अमुक जन्मीं मी बोधिसत्व म्हणून अमुक होतो. व त्यावेळीं मी अमुक केलें," असें बुद्ध सांगतात. ज्या प्रसंगामुळें जातककथा सांगण्यांत आली तो प्रसंग मुख्यत्वें करून "प्रत्युत्पन्नवत्थु" मध्यें सांगण्यांत येतो. दुसरा भाग म्हणजे अतीतवत्थु. जातकाची मुख्यकथा या भागांत असते व त्या दृष्टीनें हा भाग महत्त्वाचा असतो. खरी कथा ती हीच असते. यानंतर गाथा किंवा पद्य असतें. गाथांचा हा भाग जातककथेंतील सर्वांत प्राचीन भाग होय हें आपण आतां पाहिलेंच. जातकांतील कांहीं गाथा बुद्धपूर्व लोककथेंतून जशाच्या तशाच घेण्यांत आल्या असल्याचा संभव असल्यामुळें, व गाथांच्या स्वरूपांत अखेरपर्यंत बदल न झाल्यामुळें या गाथांवरून बुद्धपूर्व लोककथेचें स्वरूप काय असेल याचा अंदाज घेणें शक्य होतें. गाथांनंतर वेय्याकरण येतें. या भागांत गाथांचे स्पष्टीकरण असतें. चौथा भाग समोधान. हा भाग उपसंहारात्मक असतो. भूतकालीन कथा व जातककथा सांगितलेवेळीचा काळ यांचा संबंध यांत जोडलेला असतो. समोधानांत भगवान बुद्ध, जातककथेंत वर्णिलेली, बोधिसत्व व इतर पात्रें हीं सांप्रतकाळीं कोण आहेत यांचे स्पष्टीकरण करून, वर्तमानकाळाशीं जातककथेच्या भूतकाळाचा संबंध कसा येतो हें स्पष्ट करतात.

जातकथांच्या बंधाचा येवढा तपशील दिला यचें कारण जातककथेंतील मूळ कथा व तिचें पंथीय स्वरूप यांचे स्पष्टीकरण व्हावें म्हणून. त्याजबरोबर मूळकथा जर बौद्धपूर्व प्राचीन लोककथा असेल व बौद्धांनीं तिला पंथांत आणून तिच्या अंगावर पंथाचें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




महावस्त्र चढविले असेल तर धर्मांतराच्या या खटाटोपांत मूळ लोककथेंत कसे व किती बदल घडून आले अथवा घडवून आणले गेले यांचाहि खुलासा होण्यास अधिक मदत व्हावी म्हणून.

* * * *

नदी व लोककथा यांमध्यें विलक्षण साम्य दिसून येते. दोघींहि स्वभावतःच प्रवाही असतात. नदीप्रमाणेंच कथासुद्धां जन्मापासूनच भटकी असते. प्रवास करणें हा तिचा धर्मच असतो. या बाबतींत कथा नदीपेक्षांहि अधिक स्वतंत्र असते, अधिक अनिर्बंध असते. लोककथेच्या प्रवासाला नदीप्रमाणें, कोणत्याहि भौगोलिक मर्यादांची बंधनें नसतात. उत्तुंग पर्वतराजी तिला अडवूं शकत नाहीं, सप्त-समुद्र तिच्या आड येत नाहींत अथवा देश-धर्माच्या उल्लंघनाचे कोणतेहि प्रायश्चित् तिला भीति घालत नाहीं. तिचा स्वभाव एवढा लाघवी व लवचिक असतो कीं, कोणत्याही जातीच्या, वंशाच्या, अथवा धर्माच्या सुहृदास तिची भुरळ पडून त्यानें तिला आपल्याबरोबर आपल्या देशांत, आपल्या वंशांत व आपल्या धर्मांत घेऊन, स्वतःचा वेष, भाषा, धर्म देऊन, कायमची आपलीशी करावी. उत्तम लोककथा ही कोणत्याही एका गांवाची, एका जमातीची अथवा एका देशाची कायमची कधींच नसते. किंबहुना, ललितकथेसारखी ती कोणाही एकाची नसतेच; ती लोकांची असते. कांहीं लोकांचीच नव्हे तर सर्व लोकांची— सर्व लोकमात्राची.

अनेक प्राचीन लोककथा आज निरनिराळ्या वेषांत व भाषांत जगभर पसरलेल्या आढळतात तें यामुळेंच. प्राचीन काळीं भारतांत जन्मलेल्या पंचतंत्रांतील कांहीं प्राणिकथा एकाद्या दूरस्थ ग्रीक तत्त्वज्ञाच्या इसापनितीचें तात्पर्य विशद करण्याकरितां यूरोपांत पुन्हां अवतार घेतात तर कांहीं कथा अनेक शतकांच्या भटकंतीनंतर हरून अल्‌रशीदच्या मध्ययुगीन बगदादमध्यें " सुरस आणि चमत्कारिक" घटनांचे हजार अफसाने कथन करणाऱ्या शेहरजादीच्या तोंडून अरबी अल्फाजांत प्रकट होतांना दिसतात. ग्रीक इतिहासकार हेरोडोटस-पासून मध्ययुगीन ख्रिस्तीधर्म प्रचारकांपर्यंत आणि रंगेल कथालेखक बोफाशिओपासून आंग्लकवि चॉसरपर्यंत अनेकांनीं या प्राचीन-कथा निरनिराळ्या प्रसंगीं पुनःपुन्हां रंगवून सांगितल्या आहेत. कधींही स्त्रीमुख न पाहिलेल्या ऋष्यशृंगाची रामायण-महाभारत-कारांनीं सांगितलेली नवलकथा युरोपीय बोफाशिओनेंही आपल्या ढंगदार शैलीनें तेवढ्याच निःसंकोचपणें कथन केली आहे हें डी कामेरॉनच्या वाचकांस सांगावयास नकोच.

* * * *

छद्दंत जातकाची मूळ लोककथा ही एक प्राचीन भारतीय लोककथा आहे. बुद्धपूर्वकाळांत तिचा प्रसार भारताबाहेर इतरत्र किती झाला होता हें कळण्यास आज साधनें उपलब्ध नाहींत. परंतु या कथेच्या आज उपलब्ध असलेल्या प्राचीनांतील प्राचीन स्वरूपावरून ही कथा भारतांतील अतिप्राचीन लोककथा असावी असें दिसतें. या कथेचे बुद्धोत्तर स्वरूप आपल्या समोर आहेच, परंतु तिचें बुद्धपूर्व स्वरूप काय असावें याचा अंदाज बांधणें आवश्यक आहे. नदीप्रमाणेंच लोककथेचेही मूळ शोधून काढणें कठिण असलें तरी प्रयत्नशक्य असते. बौद्धमताचे महावस्त्र पांघरलेल्या या कथेच्या अंगावरील कांहीं जन्मखुणा दिसतात किंवा काय हें त्याहाळून पाहिले पाहिजे. लक्षपूर्वक न्याहाळून पाहिल्यावर मात्र पूर्वाश्रमीच्या अनेक खुणा या कथेच्या अंगावर गोंदल्याप्रमाणें अजूनही शाबूत असल्याचें दिसून येते आणि ह्या व इतर खुणांवरून तिचा मूळ वंश काय असावा, तिच्या बौद्ध पूर्व प्रकृतीचें स्वरूप काय असावे तिच्या आदिवासी निष्ठा व आदेश काय असावेत इत्यादि गोष्टींचा अंदाज करता येतो.

( कविवर्य बा. भ. बोरकरांच्या पन्नासाव्या वाढदिवसा-प्रीत्यर्थ आमचे मित्र श्री. पु. ल. देशपांडे यांनी बोरकरांना पाठवलेलें अभिष्ट-चिंतनपत्र आम्ही इथें देत आहोंत. )

**' साहित्यिक पत्रें '** पु. ल. देशपांडे न्यू दिल्ली.

**प्रिय बाकीबाब,**

तुम्हाला एकावन्नावें वर्ष लागल्याचें वृत्त कळलें. त्यानिमित्त मौज साधना पॉप्युलर ह्या तिघांनी योजिलेल्या सुंदर समारंभाची निमंत्रणपत्रिका मिळाली. फार दूर पडलों—नाहींतर धांवत आलों असतों. ह्या योजनेंत अजाणती सूचकता आहे. जीवनांत ' मौज ' केलीत—त्याच्या जोडीला ' साधना ' केलीत आणि ' पॉप्युलर ' असे तुमच्यासारखे वाङ्मयसेवक हाताच्या बोटावर मोजण्याइतके आहेत. शारदेच्या दरबारांत नुसतीच मौज आणि नुसतीच साधना मंजूर नाहीं.

—तुम्ही एकावन्न वर्षांचे झालांत हें खरंच वाटत नाहीं. आणि पुढें अनेक वर्षे वाटणारहि नाहीं. कांहीं माणसें दरवर्षी वयातीत होत जातात, कांहीं दरवर्षी वयांत येतात— भगवंताने तुम्हाला दुसऱ्या कोटींत टाकलें आहे. नव्या कवितांना देखील तोच तजेला आहे—तीच टवटवी आहे. ह्या वाढदिवसाच्या प्रसंगीं मी तुम्हाला आशीर्वाद देण्याची ऐट कशी आणूं ? मराठीच्या सेवेबद्दल आणि कोकणीच्या बोटाला धरून चालती केल्याबद्दल धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत.

तुमचा कृपालोभ बालपणापासून मला लाभला आहे. सदैव आशिर्वाद पाठीशीं असावा अशी उभयतांची प्रार्थना आहे.

तुमच्या जीवनांतल्या कडूगोड प्रसंगानां आनंदाने निभावून नेणाऱ्या —आणि आली वेळ साजरी करणाऱ्या सौ. वहिनींना धन्यवाद आणि त्यांचे अभिनंदन !

तुमचे जांवई व ल्येक अधून मधून भेटतात. कळावे.

आ.

**पुरुषोत्तम**

**ता. क.**

तुमच्या प्रमाणेंच माझाहि जन्म नोव्हेंबरांतच आहे हे कळविण्यास अत्यंत आनंद होत आहे—आणि नेहरूंचाहिं !

( महाराष्ट्रांतील प्रथितयश साहित्यिकांनी व मान्यवर व्यक्तींनी अशा तऱ्हेची पत्रें 'दीपावलीकडे प्रसिद्धीसाठीं पाठविल्यास आभारी होऊं )

अनुक्रमणिका






**मीं बसमध्यें बसलों असतां**
**शेजारीं मुसमुसत उभ्या असलेल्या प्रमदेस**



## "पुरन्ध्री माफ एवढें करा"

आली, ध्यानामध्यें आली उपस्थिती आपली
बसमाजी जाहलांत दाखल तोंच दखल घेतली !
उभ्या, अशा राहिलांत तेंही आलें लक्षामधें
(कर उंचावुन पट्टा धरणें किती तुम्हां शोभतें !)

भांगामधला सिंदुर बारिक सरळ किती रेखला
भुंवया उंचावितां धनुष्या बाण तोहि वाटला
निटिलाभंवती कुंतलवलयें महिरप आकारिती
कर्णफुलांचे लोलक हालत गालांना उजळती

अर्धोन्मीलित पापण्यातुनी चालतसे पाहणी
ओठांच्या आंखीव घडीतुन मौन गाइ रागिणी
हनु उंचावुन रागाचा जरि चढा भासला स्वर
गोल गळा परि उतार घेतो उन्नत हृदयावर

(ताठ उभें पेटीत असें हें बसमाजी राहणें
तेज किती वाढवीत तुमचें नकोच तें सांगणें !)

भवतीभंवती कितीतरी ते बसले निर्ढावले
एकहि बेटा जागेवरूनी तुम्हासाठि न हले
स्त्रीदाक्षिण्यच नाहीं कोणा, शेजारिच मम पहा
खुशाल लेकाचा खिडकीशीं खातःबैसला हवा
उठता तो जर, मींहि सरकतो खिडकीच्या बाजुला
जवळी माझ्या तुम्हा जागा होती किति पुष्कला
अर्थपूर्ण नजरेनें माझें बसणें परि पाहता
मी उठुनी निज-जागा देइन अपेक्षहि ठेवता ?
सखेद तुम्हा सांगू वाटे शक्य जरा तें कमी,
पूर्ण विचाराअन्तीं पेशा निर्णयास येत मी

समजा दिधली माझी जागा तुम्हाला ही आतां
लाभ आपल्या शेजाराचा तिसऱ्याला नाहिं कां ?
निःस्वार्थी जरि होउन मीं मम जागा तुम्हा दिली
पुण्याई ती कधीं फळाला येइल कुणि पाहिली ?

इ. स.-च्या तिसऱ्या शतकापूर्वीच ही कथा बौद्धांनीं आपल्या पंथांत आणली हें बरहुत येथील छद्दंत जातकाच्या शिल्पावरून सिद्ध होते. या जातकाची बौद्धपूर्व मूळलोककथा आज उपलब्ध नाहीं. जातककथा संग्रहांतील ५१४ क्रमांकाची पाली कथाच आज उपलब्ध आहे, आणि तीहि इ. स.-च्या पांचव्या शतकांतील सिंहलींतून पालींत भाषांतरित झालेली. तिचें पद्य प्राचीन असलें तरी गद्य इ. सनाच्या पांचव्या शतकांतील आहे. जातककथांतील गाथा ह्या अतिप्राचीन आहेत हें आपण पाहिलेंच. छद्दंत जातक ही जर मूळची भारतीय लोककथा आहे व बुद्धपूर्व प्राचीन भारतीय बहुजनसमाजाची भाषा प्राकृत—(अशोकाच्या शीलालेखांच्या भाषेसारखी) होती, तर बुद्धपूर्व जातकांतील गाथा ह्या बुद्धपूर्व प्राचीन लोककथेंतील पद्येंच होत असें ओघानेंच सिद्ध होतें.

बरहुत येथील छद्दंत जातकाचें शिल्प हा या जातककथेचा अतिप्राचीन शिल्पांकित पुरावा आहे व छद्दंत जातकांतील गाथा ह्या बरहुत शिल्पापूर्वीच्या बौद्धकथेचा किंबहुना बौद्धपूर्व प्राचीन लोककथेचाहि वाङ्मयिन पुरावा होय.

छद्दंत कथेचा नायक हत्ती आहे ही गोष्टच प्रस्तुत कथा पुरातन आहे याची साक्ष देते. छद्दंत जातकांतील अतिप्राचीन भाग ज्या गाथा त्यांचे सूक्ष्म वाचन केल्यास त्यांतून सूचित होणाऱ्या हत्तीच्या वर्णनांवरून आणि स्वभावभेदांवरून अथवा त्यांत वर्णन केलेल्या हत्तीच्या शिकारीच्या अतिप्राचीन पद्धतीवरून सदरहू कथा केवळ बुद्धपूर्वच नव्हे तर बौद्धांच्याहि अतिप्राचीन काळची आदिवासी लोककथा असावी असें अनुमान निघते.

उपलब्ध असलेल्या पुराव्यांवरून उत्तर अश्मयुगीन मानवाच्या समाजरचनेचे जें स्वरूप आज आपल्या समोर उभें रहाते, तें अभ्यासिले कीं सृष्टींतील प्राण्यांवर आरोप करून मनांतील भावविभावांना आविष्कारित करण्याचे प्रयत्न आदिमानवानें अत्तर अश्म युगांपासूनच (म्हणजे ३० हजार वर्षांपूर्वी पासून) केले होते असें दिसून येते. इतर प्राणिमात्रांवर शिकारी मानवानें निश्चित विजय मिळवून आपलें श्रेष्ठत्व यापूर्वीच सिद्ध केलें असलें तरी इतर प्राणिमात्रांबद्दल शिकारी मानवाला तुच्छता अथवा अनादर न वाटतां, त्यांच्याबद्दल एक प्रकारचें भावनिक प्रेम वाटत होते हें या शिकाऱ्याचें एक वैशिष्ट्य होते. आदिमानवानें काढलेल्या चित्रांतून हें भावनिक प्रेम निरनिराळ्या तऱ्हांनीं प्रकट झालेले दिसतें तें यामुळेंच. अश्मयुगीन मानवानें आलेखित केलेल्या आविष्कारांत निरनिराळ्या प्राण्यांचीं व त्यांच्या शिकारीचीं अनेक चित्रें सांपडतात यांचे कारणही

---

जीवन हें थोडकें, प्रेम परि अनंत आहे, असें
म्हणती या भरवशावरी ना-शोध घेति माणसें ?
क्षणदाक्षिण्यें पुन्हा नाहिं जर भेटीची शाश्वती
आरामाची प्रवास-बैठक सोडण्या न घे मती
आदर साऱ्या सौन्दर्याचा ठेवोनीही पुरं
वसुन राहतो जागेवरती निगरगट्टही खरा
लखलाभ असो रूप तुम्हाला, सुखदासन या नरा
उभ्या तुम्हीं बसत्यास पुरन्ध्री माफ एवढें करा

— एकू





हेंच. चित्रांप्रमाणेंच, आज लुप्त झालेल्या तत्कालिन लोककथांत अथवा लोकगीतांतही या भावनिक प्रेमाचे चित्र उमटलें असलेंच पाहिजे, असे निश्चित अनुमान, आजही प्रचलित असलेल्या अनेक आदिवासी जमातींच्या कथागीतांचा अभ्यास केला असतां काढतां येते.

हत्ती व मानव यांचे संबंध इतर प्राण्यांप्रमाणेंच फार प्राचीन आहेत. उत्तर अश्मयुगीन मानवाच्या कलात्मक आविष्कारावरून प्रथम हे संबंध कोणत्या स्वरूपाचे होते याची कल्पना येते. गुहांतील भिंतींवर, शिलाखंडांवर, शिंगांवर आणि प्रत्यक्ष हस्तिदंतावर आलेखित केलेल्या आविष्कारांत हत्तीची, मॅमथहत्तींचीं अथवा त्यांच्या शिकारीचीं अनेक चित्रें निरनिराळ्या प्रकारांनी कोरलीं-चितारलेलीं आढळतात. आदिमानवाच्या मनोजनित सृष्टीचें प्रत्यक्ष प्रतिबिंब सांठविलेल्या आरशाचे फक्त येवढेच तुकडे आज हातीं लागले आहेत. तत्कालीन कथागीतांचे स्वर-अक्षर साहित्यमात्र विस्मृतीच्या निःशब्द बहिऱ्या काळोखांत कायमचें गडप झाले आहे. या आदिलिखितांतून डोकावणारे प्राचीन गजराजाचें धीट व्यक्तिमत्व न्याहाळलें कीं आदिमानवाच्या मनांत हत्ती या प्राण्याविषयीं काय भावना होत्या याची कल्पना येते. धीट धिप्पाड आकाराच्या प्रभावी कर्तृत्वाचे हे अश्मयुगीन आलेखन आजही आदिमानवाच्या त्या "पहिल्या मुग्धप्रेमाची" बोलकी साक्ष देते.

* * *

प्रथम दर्शनींच प्रेम बसावें असें हत्तीचें व्यक्तिमत्वच अद्वितीय व प्रभावी होते.

* * *

पृथ्वीचें वय आज सरासरी ३०००,००००० वर्षांवर आहे. पैकीं याचा एक तृतीयांश भाग म्हणजे १०००,००००० वर्षांपासूनच पृथ्वीवर सजीव सृष्टीचें वास्तव्य आहे. कल्पनातीत असलेल्या या काळखंडांत पृथ्वीवरील अत्युच्च शिखरांपासून तो महासागराच्या अथांग अंधाऱ्या तळापर्यंत, सर्व उंचनीच पातळ्यांवर सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनही न दिसणाऱ्या अतिसूक्ष्म जंतूंपासून तों प्रचंड शिलाखंडाप्रमाणें आकार धारण करणाऱ्या 'धुंडिराज' हत्तींपर्यंत, जीवमात्राच्या असंख्य तऱ्हा निर्माण झाल्या व नाहींशा झाल्या. डिनासॉर, ब्राशिओसॉरसारख्या अजस्त्र सरपटणाऱ्या प्राण्यांचे अधिराज्य प्रथम पृथ्वीवर होते; परंतु पन्नास टन वजनाचे हे अजस्त्र पाणी आपल्या १२००,००००० वर्षांच्या वास्तव्यानंतर जवळ जवळ ४९०,००००० वर्षांपूर्वी एकाएकीं कांहीं अज्ञात कारणामुळें नाहींसे झाले. त्यानंतर प्राणिमात्राच्या स्तन्यप्राण्यांच्या (मॅमल्स) शाखेचे दुसरें प्रदीर्घ युग सुरू झाले. हत्ती हा स्तन्यप्राण्यांच्या शाखेंतील आजही हयात असलेला सर्वांत मोठा प्राणी. हत्तीपुरतेंच बोलावयाचें झाल्यास, स्तन्यप्राण्यांच्या या प्रदीर्घ रियासतींत, हत्तीकुळाच्या जवळ जवळ तीनशें निरनिराळ्या शाखा आतांपर्यंत निर्माण झाल्या आहेत; व उत्क्रांतीच्या अव्याहत वाटचालींत यापैकीं, आज फक्त दोनच घराणीं शिल्लक उरलीं आहेत. एक, आफ्रिकन हत्तीचें 'लक्षोदंत' घराणें व दुसरें एशियाटिक हत्तीचे 'एलिफस्' घराणें.

हत्तीचा पिंड व कुळ यांच्या उत्क्रांतीचा इतिहासहि तसाच मनोरंजक आहे. हत्तीची प्राणीशास्त्रिय वैशिष्टयें म्हणजे त्याचा आकार, त्याची सोंड व त्याचे दांत या तीन वैशिष्टयांच्या उत्क्रांतीची कथा म्हणजेच हत्तिवंशाच्या उपरिनिर्दिष्ट अनेक शाखांचा इतिहास होय.

उत्खननाच्या दाखल्यावरून आदमासे सात कोटी वर्षांपूर्वी हत्तिकुळाच्या उत्क्रांतीला आफ्रिकेंत सुरुवात झाली असावी असा शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. त्यावेळच्या आफ्रिका खंडाचा व इतर जगाचा नकाशा आजच्यापेक्षां अगदींच वेगळा होता. उत्तर आफ्रिकेच्या बऱ्याचशा भागावर टेथीसचा प्राचीन समुद्र होता व सहाराच्या वाळवंटाच्या जागीं अटलांटिक महासागरांपासून अरबस्तानच्या पश्चिम किनाऱ्यापर्यंत पसरलेली हिरवळीची पाणथळी जमीन होती. उत्तर व दक्षिण अमेरिका हे खंड आजच्याप्रमाणें वेगळे नसून अलास्का व सैबेरिया हे भाग, बेअरिंगच्या सामुद्रधुनीच्या ठिकाणीं मोठ्या भूभागानें एकमेकांस जोडलेले होते. युरोप खंडसुद्धां आजच्या जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीजवळ व इटलीच्या दक्षिण टोंकाशीं-आफ्रिका खंडास जोडला गेला होता. त्याचप्रमाणें पॅसिफिक महासागरांतील आजची ईस्ट इंडिज बेटें हीं आतांप्रमाणें तुटक भूखंड नसून एका लांब भूशिराच्या स्वरूपांत आशिया खंडाशीं जोडलीं गेलीं होतीं. फक्त ऑस्ट्रेलिया व अंतार्तिक हे भूखंड वगळले तर सारी पृथ्वी सलग होती व कोणत्याही प्राण्याला सर्व खंडांत जमिनीवरून चालून जाणें शक्य होतें. प्राचीन हत्तिवंशाचा जगभर संचार झाल्याचे दाखले उत्खननांत मिळतात याचें कारण त्या काळच्या जगांत हत्ती हा प्राणी जमीनीवरून अक्षरशः वाटेल तेथें चालून जाऊ शकत होता हें होय.

* * *

प्राणिशास्त्राला ज्ञात असलेल्या हत्तिवंशाच्या उत्क्रांतीच्या सुरुवातीस—म्हणजें सात कोटी वर्षांपूर्वी – हत्तीचें स्वरूप आजच्या मानानें फारच क्षूद्र होते. जेमतेम दोन अडीच फूट उंच असलेल्या ह्या प्राण्याला सोंड नव्हती व लांब सुळेही नव्हते. एखाद्या गांवठी डुकरासारखा दिसणारा त्या वेळचा हत्ती उत्तरआफ्रिकेच्या पाणथळी जमिनींत उगवणाऱ्या गवती झुडपांवर आपली गुजगण करून उत्क्रांतीच्या अनंत प्रवासाची वाट चालत होता. नंतरच्या सहाशें लक्ष वर्षांच्या प्रदीर्घ कालावधींत या प्राण्याचें संपूर्ण स्वरूप येवढें बदललें कीं केवळ आकाराच्या जोरावरच हत्ती हा सर्वांत प्रचंड स्तन्य प्राणी ठरला. गेंड्याच्या वंशांतील बॅलुशिथेरिअम हा प्राणी हत्तीपेक्षांही आकारानें मोठा वाढला खरा (मंगोलियांत सांपडलेल्या हाडांच्या सांपळ्यावरून तो दोन मजली बस येवढा मोठा असावा असा तज्ज्ञांचा अंदाज आहे.) परंतु आकाराखेरीज इतर महत्त्वाच्या गुणांच्या अभावीमुळें, प्राणिमात्रांच्या युयुत्सु जीवनसंघर्षांत तो फार काळ टिकला नाहीं. किंबहुना अवजड आकाराचे बहुतेक सारे स्तन्य प्राणी प्रकृतींतील कोणत्यातरी दोषांमुळें अंदाजे साडेतीनशे लक्ष वर्षांपूर्वींच कायमचे नाहीसे झाले.

* *

याला अपवाद फक्त हत्ती ठरला.

* *

उत्क्रांतीच्या परिवर्तनांत सोंड ह्या महत्त्वाच्या अवयवाची वाढ झाली, जबड्यांतून प्रचंड सुळे बाहेर आले, खांबासारख्या मजबूत पायांवर सावरलेल्या शरीरानें अजस्त्र आकार धारण केला. या धिप्पाड





व्यक्तिमत्वाला शोभेल अशी प्रचंड शक्तीही अंगीं आली. अफाट शक्ति असलेल्या अवाढव्य शरीराला बारा फूट लांब पल्ल्याच्या टोंकदार, मजबूत सुळ्यांच्या हस्तिदंती शस्त्राची जोड मिळाली व प्राणिमात्रांच्या युयुत्सु जीवनसंघर्षांत प्रकृति व पराक्रम ह्या दोन्हींही दृष्टींनीं हत्ती हाच त्या काळच्या जगांतील सर्वश्रेष्ठ स्तन्यप्राणी ठरला.

दहा लक्ष वर्षांपूर्वी हत्तिकुळांत होऊन गेलेलीं, डिनोथेरिअम, स्टेगडॉन गणेश, पॅलिओ लॅक्सोडॉन, ट्रिलोफोडॉन, इ. इ. घराणीं म्हणजे हत्तिवंशाच्या इतिहासांतील चढत्या आलेखाचे उच्चांक होत. आजच्या हत्तींचे हे प्राचीन प्रतापी पूर्वज एकापेक्षां एक चढत्या शक्तीचे व वरचढ पराक्रमाचे होते. त्यांतही, आशिया, यूरोपांत प्रामुख्यानें ज्यांचे अवशेष आज उत्खननांत सांपडले आहेत त्या "स्टेगाडॉन गणेश" व "पोलिओ लॅक्सोडॉन अँटीकस" हे हत्तिवंश तर विशेषत्वानें बलाढ्य होते. तीक्ष्ण टोकांचे बारा फूट लांब वज्रप्राय सुळे धारण केलेले–पंधरा फूट उंच असलेले हे धिप्पाड धुंडिराज हत्तीकुळाच्या एरव्हीं दांडग्या व अगडबंब असलेल्या इतिहासांतहि प्रचंडतर समजण्यांत येतात. अगदीं अलीकडच्या काळांत मानवानं साऱ्या पृथ्वीवर आपलें अधिराज्य स्थापन करीपर्यंत पृथ्वीवरील सर्व चराचर सृष्टींत, आकारानें, शक्तीनें व पराक्रमानें हत्ती हा एकमेव सामर्थ्यवान सर्वश्रेष्ठ प्राणी होता.

* * *

सहज दिलेल्या धडकांनीं मोठमोठे वृक्ष लीलया उन्मळून पाडणारी रग अंगांत असल्यामुळें कोणत्याहि निबिड अरण्याची अथवा उंच गवती रानाची हत्तीला क्षिती वाटत नव्हती. गर्दझाडीच्या हिरव्या जाळींतून बेगुमान घुसून वाट काढणारा दांडगा गजराज, प्रसंग पडल्यास त्याच जंगलांतून काडीचा आवाजहि होऊं न देतां एखाद्या 'कृष्ण-अभिसारिके'च्या अलगद पावलांनीं अंग चोरून वाट काढू शकतो हें त्याच्या अवजड आकाराचें एक आश्चर्यकारक लाघव होतें व आहे. तीक्ष्ण घ्राणेंद्रिय व तल्लख श्रवणेंद्रिय ह्यांच्या सहाय्यानें पंचक्रोशींतील प्रत्येक हालचालीची चाहूल बसल्या जागीं व तात्काळ मिळत असल्यामुळें रानांतील हिंस्र श्वापदांच्या कोणत्याहि गनीमी हल्ल्यापासून भीति बाळगण्याचें त्याला कारण नव्हते. शक्तीमान सुर्डीव शुंडादंडाचा तडाखा, वजनदार पावलांचा ऊरफोड्या दाब आणि अणकुचिदार सुळ्यांची आंतडी फाडणारी खुपस या साऱ्यांचा भलाबुरा अनुभव रानांतील बहुतेक प्राण्यांना होताच. एकट्या दुकट्या हत्तीच्या वज्रप्राय कराळ सुळ्यांच्या प्रत्यक्ष समोरासमोर तर सोडाच परंतु जवळपास फिरकण्याची हिंस्र वाघ—सिंहांच्या कळपांचीसुद्धां छाती नव्हती; मग गजघटांच्या कचाट्यांत सांपडलेल्या एकाद्या स्वयमेव मृगेंद्रांची काय त्रेधा तिरपिट उडत असेल याची कल्पनाच केलेली बरी. मदोन्मत्त हत्तींची गंडस्थळें भेदून त्यांत असलेल्या तथाकथित मोत्यांचा चारा खाणाऱ्या खुळ्या काल्पनिक वनकेसरींचा किंवा गजघटांना न जुमानणाऱ्या उद्धतमूर्त पंचाननांचा कविकल्पित जन्म व्हावयास अजून हजारों शतकांचा अवधि जावयाचा होता.

शीत उष्ण अथवा सम-शितोष्ण यांपैकीं कोणत्याही हवामानांत हत्ती जगूं शकतो हें सर्व स्तन्य प्राण्यांत हत्तीचें एक वैशिष्ट्य आहे. त्याचप्रमाणें मृदु अथवा कठिण, उंचसखल अथवा डोंगरपठारी अशा कोणत्याहि भूपृष्ठावरून तो चालूं चढूं अथवा उतरूं शकतो हेंहि त्याचें दुसरें वैशिष्ट्य आहे. या स्वभावविशेषामुळेंच शीत कटिबंधापासून तों विषुववृत्तापर्यंत, अथवा पामीरच्या पठारांपासून तों ॲमाझॉनच्या खोऱ्यापर्यंत जगांतील कोणत्याहि स्थळीं जाणें त्याला शक्य असतें. हत्ती हा अफाट भटकणारा प्राणी होता. त्याचप्रमाणें तो अफाट खाणाराही होता. आपल्या प्रचंड आहारासाठीं, हिरव्या शिवाराच्या शोधांत तर त्याला नेहमींच भटकावे लागे. आस्ट्रेलिया खंड व अन्तार्तिक भूभाग सोडून सर्व जगभर उत्खननांत सांपडणारे हस्तिदंताचे प्रचंड भूमिगत साठे पाहिले कीं प्राचीन काळीं हत्तींचे असंख्य कळप पोटासाठीं सर्व जगभर कसे वणवण हिंडले असतील याची कल्पना येते.

हत्तीला पाणी फार प्रिय. त्यांतहि पाण्यांत डुंबण्याची त्याला मनापासून आवड. त्याच्या ह्या आवडीमुळेंच हत्तीचे अतिप्राचीन पूर्वज हे पाणघोड्यांप्रमाणें जलचर असावेत असें कांहीं शास्त्रज्ञांचे मत आहे. नदीवर डुंबत असलेल्या हत्तींचा कळप म्हणजे रानांतील एक अत्यंत मनोहर दृश्य असतें असें सर्व शिकारी सांगतात. पाण्यांत एकमेकांशीं पाठशिवणीचा खेळ खेळणें, तरुण नरमादींनीं एकमेकांवर चुळा टाकून एकमेकांना छेडणें, खोडकर कलभांनीं वृद्ध हत्तींवर पाण्याच्या चुळकांड्या सोडून त्यांना खिजविणें, पाण्यावर अंग लोटून देऊन मजेंत तासन् तास तरंगणें, पाण्याखालीं सुरकांड्या मारणें, निरनिराळे आवाज काढून हवेंत पाण्याचीं शेकडों कारंजीं उडविणें वगैरे वगैरे जलक्रीडेचे नानाप्रकार वन्यहत्ती आदि-मानवापूर्वीपासून खेळत आले आहेत. (आजही —"पुढच्यावर्षी लवकर या" अशी ताकीदवजा विनंति करून दर भाद्रपदांत आम्हीं गणराजाच्या मूर्तीचें कोणत्यातरी जलाशयांत विसर्जन करतो, तें मूळ गजराजाचें जलक्रीडा प्रेम लक्षांत घेऊन तर नव्हे ?—)

हत्ती हा सर्व स्तन्य प्राण्यांत पट्टीचा पोहणारा समजण्यांत येतो. पुरुषभर पाणी असलेले किरकोळ नदीनाले ओलांडणें तर त्याला

प्रकृतिसुलभ असतेंच, परंतु महानद, मोठमोठीं सरोवरें, तळीं अथवा तत्सम मोठे जलाशय हेहि लीलया पोहून पार करणें त्याला सहज शक्य होते. एक देवमासा सोडला, तर त्याच्या आकाराचा व वजनाचा दुसरा कोणताही जलचर महासागरांत सुद्धां मिळणें कठिण आहे. त्यामुळें जमिनीवर तसाच जमिनीवरील लहानमोठ्या जलाशयांतही हत्ती त्याकाळीं बलशाली होता. या जलाशयांतून वास्तव्य करणाऱ्या मीनांना अथवा मकरांनां, या अजस्र पोहणाऱ्याच्या वाटेस जाण्याचें धाष्ट्र्य त्याकाळीं नव्हते (व आजही नसतें.) मकरनें धरलेला पाय सोडविण्याकरितां आक्रोशी आक्रांत करणारे तथाकथित पौराणिक गजेंद्र जन्मण्यास–पुराणांच्या भाषेंत सांगावयाचे झाल्यास–अजून हजारों युगांचा अवधि होता.

देहयष्टीच्या अजस्र यंत्रणेमुळें जहालांतले जहाल हलाहलही निष्प्रभ करण्याची निसर्गदत्त प्रतिकारशक्ति अंगीं असल्यामुळें, कोणत्याही वासुकीच्या विखाची अथवा अजगरी आकाराची तमा बाळगण्याचें हत्तीला कारण नव्हतें. चुकलेलीं मृगशावकें सरसकट गिळण्याचा सराव झालेल्या अजगरानें समग्र हत्ती गिळण्याची आधाशी हांव धरणें -- म्हणजे लहान तोंडी मोठा घास घेणाऱ्या नागरी मूर्खपणाचें लक्षण होते. जंगली जीवनाच्या हिशेबी व्यवहारांत ते अव्यवहार्य व गैरहिशेबी होते. एका प्राचीन चिनी म्हणींत, अत्यंत आधाशी माणसास हत्ती गिळण्याचा प्रयत्न करणाऱ्या मूर्ख अजगराची उपमा दिलेली आढळते ती यामुळेंच.

हत्तिवंशाच्या उत्क्रांतीचा आलेख ऐन चढाईत असतांना जमिनीवरील कोणत्याही वन्य शक्तीला पुढील कालखंडांत–आव्हान देणारा भूपृष्ठावरील सर्वांत प्रबळ शत्रु जो शिकारी मानव हा उत्क्रांतीच्या "नरो वा वानरो वा" असल्या अर्धवट स्थितींत होता. आतां तो माकड राहिला नसला तरी अजून संपूर्ण मानवही झाला नव्हता. स्वतःच्या "पायांवर उभे राहून चालण्यास" तो नुकताच शिकला असला तरी प्रभावी शिकारी होण्यास त्याला अजूनही बरीच तपश्चर्या करावयाची होती. पुढें अनेक शतकांनंतर "पृथ्वीपति" म्हणून मिरविणाऱ्या या माकडाला, हत्तीनें अजून कांहीं काळ तरी भिण्याचें कारण नव्हते.

जमिनीवर कोठें प्रतिबंध नाही, पाण्यांत भय नाही, रानांत दहशत बसवील असा शत्रु नाही अथवा शिकारी नाहीं. वार्धक्यामुळें, प्रकृति अस्वास्थ्यामुळें अथवा अपघातानें येणाऱ्या मृत्यूखेरीज भीति वाटावी अशी एकही शक्ति नाही अथवा वस्तु नाहीं. त्यामुळेंच उत्क्रांति आलेखाच्या चढत्या भाजणींत असलेला हत्ती केवळ प्राणिमात्रांतच नव्हे तर भूपृष्ठावरील सर्व चराचर सृष्टींत निर्भय होता. उत्क्रांतीनें प्रचंड शक्ति देऊन त्याला समर्थ केले होते तसेंच सृष्टीनें अभयाचे वरदान देऊन समर्थ ठरविले होते. हत्ती सर्व अर्थांनीं समर्थ होता व समर्थपणेंच जगत होता. पृथ्वीवरील स्तन्य प्राण्यांच्या अगणित गणांचा तो 'गणपति' होता—हिंस्र श्वापदांचा शास्ता होता—तसाच जीव घेऊन पळणाऱ्या हरणांना अक्षरशः पोटाशीं घेऊन, हिंस्र श्वापदांपासून अभयदान देणारा—अबलांचा रक्षणकर्ता—हेरंब होता. शीत, उष्ण अथवा समशीतोष्ण हवामानांत—पूर्व-पश्चिम अथवा उत्तर-दक्षिण—भूपृष्ठावर वाटेल तेथे व वाटेल तेव्हां अप्रतिहत संचार करणारा तो दिग्गज—अश्मयुगपूर्वकालीन दिग्विजयी, "नमयति इव धरित्रीम्—" असा सार्वभौम भूपति होता.

+ + + +

अश्मयुगांत हत्तिवंशाच्या उत्क्रांति आलेखाला उतरती कळा लागली आणि त्याच सुमारास आजचा मानव—मानवशास्त्राच्या अर्थानें—संपूर्ण मानव बनला.

इतर प्राण्यांच्या मानानें विचार केला तर मानव म्हणजे सृष्टीचें एक नावडतें अपत्य असावेसे वाटते. इतर प्राण्यांजवळ असलेल्या गुणांपैकीं एकही गुण सृष्टीनें त्याला दिला नव्हता. स्वतःचें संरक्षण करण्याकरितां अथवा दुसऱ्यावर आक्रमण करण्याकरितां आवश्यक असलेला कोणताही संरक्षक अथवा आक्रमक अवयव त्याच्याजवळ नव्हता. शत्रूच्या कचाट्यांतून सुटण्याकरितां हवा असलेला तुफान वेग त्याच्या गतींत नव्हता; निसर्गाच्या रंगरूपांत बेमालूम मिसळून शत्रूची फसगत करण्याचे नैसर्गिक बहुरूपी कसब त्याला सृष्टीनें दिलें नव्हतें. पक्ष्यांप्रमाणें आकाशांत उंच उडून जाण्याची सोय नव्हती अथवा माशांप्रमाणें खोल पाण्यांत अनेक तास दडी मारून बसण्याएवढा दम त्याच्याजवळ नव्हता.

दांत, सुळे व नखें हीं इतर कोणत्याहि प्राण्याच्या मानानें आंखुड, बोथट व निरुपद्रवी होती आणि गाढवाच्या उलट्या लाथासुद्धां अधिक प्रभावी ठराव्या एवढीं त्याचीं गात्रें कमजोर होतीं. मानव पायापासून डोक्यापर्यंत नखशिखांत उघडा होता—कींव करण्याएवढा पोरका होता. परंतु सृष्टीच्या या पोराला कल्पकता व साधनसिद्धता या दैवी गुणांचे येवढें बहुमोल वरदान मिळालें होतें कीं या दोन गुणांच्या जोरावरच त्यानें सर्व प्राणिमात्रावर मात करून तो अद्वितीय ठरला. आकारानें व शक्तीनें हत्तीपेक्षां कितीतरी पटींनीं धाकटा व थिटा असलेला मानव–हातांतील आयुधांच्या जोरावर हत्तीकुळाच्या सर्वंकष सत्तेला आव्हान देणारा एकमेव प्रभावी प्रतिस्पर्धी ठरला. पृथ्वीवर सत्ता कोणाची? हत्तीची कीं मानवाची?—सत्तेच्या या "नरो वा कुंजरो वा" संघर्षांत, हजारों वर्षें "अजात शत्रु" ठरलेल्या गजघटांनां मृत्यूचा धाक घालणारा मानव हा पहिला धाडसी शिकारी ठरला.

× × ×

हत्ती म्हणजे आदिमानवाचा जवळचा सोन्याचा साठा. साजशृंगाराचीं लेणीं अथवा शिकाराचीं आयुधें इत्यादि उपकरणीं घडविली जाणाऱ्या बहुमोल हस्तिदंताची खाण. एक हत्ती मारला कीं आदिमानवाच्या अनेक ऐहिक गरजा भागविल्या जात, त्यामुळेंच हत्तीची शिकार ही इतर प्राण्यांच्या शिकारीपेक्षां अत्यंत धाडसी असली; तरी तें धाडस करण्यायोग्य समजली जाई. अन्न, हस्तिदंत इत्यादि वस्तूंच्या लौकिक लाभापेक्षांही हत्तीसारख्या श्रेष्ठ शत्रूवर मिळविलेल्या विजयाचा आनंद त्यात अधिक असे. जीवनाच्या युयुत्सु संघर्षांत बलाबलाची कसोटी ठरून मानवी मनांतील सुप्त विजिगीषु ईर्षा तृप्त झाल्याचा अलौकिक उन्माद त्यांत अधिक असे.

हत्तीला मारणारा आदिमानव धाडसी खरा परंतु जंगलांतल्या वाघसिंहादि हिंस्र श्वापदासारखा तो केवळ क्रूर शिकारी नव्हता;









सावजाचे गुण ओळखणारा, त्या गुणांची कदर करणारा, येवढेंच नव्हे तर त्यांचे गुणगान गाणारा सहृदय—विचारी शिकारी होता. माकडाचा मानव होत असतांना त्यानें हस्तिवंशाचे पूर्वपराक्रम पिढ्यानपिढ्या पाहिले होते. हत्तीचे विशाल व्यक्तिमत्व-सामर्थ्य व कर्तृत्व याबद्दल त्याच्या भावनाक्षम मनांत निव्वळ भीतिच नव्हे तर आदर निर्माण झाला होता. आदिमानवानें हस्तिदंतावर काढलेलीं अनेक सुंदर चित्रें आज उपलब्ध झालीं आहेत. आशिया खंडांतील कांहीं वन्य जमातींत अजूनही हत्तीचें नांव घेऊन निर्देश करणें म्हणजे त्या थोर प्राण्याचा अपमान करण्यासारखें समजतात. आफ्रिकेंतील वन्य जमाती, आजही, शिकारींत मारलेल्या मृतहत्तीच्या कलेवराभोंवतीं—विलापिका गाऊन—त्या थोर प्राण्याच्या निधनाबद्दल शोक करतात. हत्तीनें आपल्या शत्रूच्या मनांत निर्माण केलेल्या आदराच्या ह्या खुणा आहेत.

मनांतील भावना आविष्कारित करण्याची पात्रता आदिमानवांत आल्यानंतर—हत्तीसंबंधीचा हा भाव त्यानें मोकळ्या मनानें व रसिकतेनें रेखून गाऊन अथवा कथन करून ठेवला आहे. अश्म युगीन गुहांतील भित्तिचित्रें-प्राचीन आदिवासींची लोकगीतें व लोककथा ह्यांवरून वरील विधानाची प्रचीति येते. मनांतील भावविभावांना चित्ररूपानें, पद्यरूपानें अथवा कथारूपानें आविष्कारित करून, पुन्हां पुन्हां त्यांचा आनंद लुटणें हाच या शिकाऱ्याच्या अद्वितीय माणुसकीचा मोठा गुण होता. स्वतः ठार केलेल्या हत्तीच्या हस्तिदंतावर त्याचीच सुंदर आकृति रेखाटणें, त्याच्या मृत्यूला स्वतः कारण होऊनही स्वतःच त्याबद्दल शोक करणें हीच या शिकाऱ्याच्या घरची उलटी खूण होती.

* * *

धैर्य, औदार्य, प्रेम, क्षमाशीलत्व व सौजन्य इत्यादि अनेक धीरोदात्त गुणांचा साक्षात्कार आदिमानवाला, हत्तीच्या विशाल व्यक्तिमत्वांत झाला, आणि सृष्टींत जे जे उदात्त दिसलें ते तें त्यानें हत्तीच्या मापानें मोजले, आपल्या—चित्रगीतकथांतून—मानवी व्यवहाराचे आदर्श—हत्तीच्या उदाहरणानें सूचित केले.

हत्ती हा कळपानें रहाणारा प्राणी. कळपाचा नेता व शास्ता या नात्यानें त्याला अनेक जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागत. संकटकाळीं कळपाचा तो नेता असे, कळपांतील माद्यांचा स्वामी असे—व आपल्या कळपाबरोबरच जंगलांतील इतर प्राणिमात्राचें हित साधणारा समर्थ शास्ता असे. बाबतींत त्याचें मानवी स्वभावांशीं बरेंच साम्य दिसून येई. हें साम्य लक्षांत आल्यामुळेंच आदिमानवाच्या पहिल्या आविष्कारांत हत्तीला नेहमींच धीरोदात्त नायकाचें स्थान मिळालें आहे. पराक्रमी नेता—शूरलढवय्या—थोरपति—सबळशास्ता क्षमाशील शत्रु व उपकारकर्ता मित्र इत्यादि अनेक श्रेष्ठ भूमिकांतून त्याचें प्राथमिक आदिवासी लोककथांतून चित्रण झालेले दिसते ते वरील कारणांमुळेंच.

छद्दंत जातक कथेंतील अतिप्राचिन भाग जोगाथा त्यांतील हत्तीच्या वर्णनावरून हत्तीचें अतिप्राचीन धीरोदात्त 'आदिमानवी' व्यक्तिमत्वच सूचित होते. सदरहू जातकाचे बरहुत येथील प्रथम शिल्प न्याहाळल्यास या आविष्कारांतही बौद्धपूर्ण हत्तीविषयक कल्पनाच चित्रित केल्या गेल्या असल्याचें आढळून येते. या दोन्हींही पुराव्यावरून छद्दंत जातकाची मूळकथा ही केवळ बौद्धपूर्वच नव्हे तर बौद्धांच्याही पूर्वीची अतिप्राचीन लोककथा असली पाहिजे असें स्पष्ट अनुमान निघते.

* * * *

—परंतु त्या आधीं आज उपलब्ध असलेली बौद्ध जातक-कथा काय आहे हें पहाणें आवश्यक आहे.

* * * *

फार पूर्वी हिमालयावर आठ हजार हत्तींच्या कळपांचा राजा षडदंत आपल्या परिवारासह एका तळ्यावर, प्रचंड वटवृक्षाशेजारीं असलेल्या कांचनगुहेंत रहात होता. त्याला दोन राण्या होत्या; थोरली सुभद्रा व धाकटी सुभद्रा.

एके दिवशीं मोठें शालवन बहरलें आहे असें कळल्यावरून "शालक्रीडा" करण्याकरितां हत्तिराज आपल्या परिवारासह शालवनांत गेला. वनांत फिरत असतांना एका भरघोस फुललेल्या शालवृक्षाला त्यानें मस्तकानें सहज धडक दिली. योगायोग असा कीं त्यावेळीं धाकटी सुभद्रा वाऱ्याच्या दिशेनें उभी होती. तिच्या अंगावर फांदीच्या सुकलेल्या काड्या, वाळलेलीं पानें व झाडावरच्या तांबड्या मुंग्या पडल्या. पण थोरली सुभद्रा झाडाखालीं निवाऱ्याच्या जागीं उभी होती, तिच्या अंगावर पुष्परेणु—केसर व पानें पडलीं. हें पाहतांच, "आपल्या प्रिय पत्नीवर त्यानें पुष्परेणु व पानें पाडलीं, आणि माझ्या अंगावर सुकलेल्या काटक्या, वाळलेलीं पानें व तांबड्या मुंग्या पाडल्या काय?—ठीक आहे, पाहून घेईन!" असें म्हणून धाकट्या सुभद्रेनें हत्तिराजाशीं मनांतल्या मनांत वैर धरलें.

नंतर एके दिवशीं हत्तिराज आपल्या परिवारासह स्नानासाठीं तळ्यांत उतरले. वाळ्याचे गुच्छ सोंडेंत धरून परिवारांतील कांहीं हत्तींनीं हत्तिराजाचें अंग घासून त्यास स्नान घातलें. तो स्नान करून बाहेर आल्यानंतर त्यांनीं हत्तीराजाच्या दोन्हीं राण्यांनाही स्नान घातलें. स्नान झाल्यानंतर त्याही हत्तिराजाजवळ येऊन उभ्या राहिल्या. नंतर कळपांतील इतर हत्तींनीं जलविहार केला व तळ्यांतून नानापुष्पें आणून—हत्तिराजाला शृंगारलें. एकानें हत्तिराजाला महापद्म आणून दिलें तें सोंडेनें घेऊन त्यांतील पराग मस्तकावर विखरून हत्तिराजानें तें ज्येष्ठ पत्नी थोरली सुभद्रा हीस दिले. धाकट्या सुभद्रेनें हें पहातांच "महापद्मासारखें फूल आपल्या प्रिय भार्येला देतो, मला देत नाहीं" असें म्हणून तिनें हत्तिराजाशीं पुन्हां वैर धरलें.

मत्सरी धाकट्या सुभद्रेनें पच्चेक बुद्धांना फळें अर्पण करून प्रार्थना केली कीं, "येथें मरण पावून महाराजांच्या कुळांत जन्म पावून, सुभद्रा नांवाची राजकन्या होऊन वयांत आल्यावर, वाराणसीच्या राजाची आवडती पट्टराणी होऊन—माझ्या मनासारखें करण्यास समर्थ होऊन, त्याच्या अनुज्ञेनें एक शिकारी पाठवून या हत्तीला ठार करून याचे सुळे आणविण्यास मी समर्थ व्हावें."

तेव्हापासून तिनें अन्न सोडलें व झुरत जाऊन ती लौकरच मरण पावली, आणि मद्रदेशाच्या राजाच्या राणीच्या पोटीं जन्माला आली. तेथेंही तिचें नांव सुभद्राच ठेवण्यांत आलें. नंतर वयांत आल्यावर तिला वाराणसीच्या राजाला देण्यांत आलें.

राजाच्या सोळा हजार स्त्रियांत ती ज्येष्ठ व आवडती होती. पूर्वजन्मीची स्मृति तिला झाली. तिच्या मनांत आलें. "माझी प्रार्थना सिद्धीला गेली. आतां त्या हत्तिराजाचे सुळे मी आणवीन."

नंतर आजारी असल्याचें नाटक करून ती मंचकावर पडून राहिली. आवडती राणी आजारी असल्याचें पाहून राजा शयनमंदिरांत गेला व त्यानें विचारलें.

"हे सुंदरी, तूं कशाचा शोक करीत आहेस? सोन्यासारखी अंगकांति असलेली तूं निस्तेज झाली आहेस. हे विशालाक्षी, चुडविलेल्या माळेप्रमाणें तूं म्लान झाली आहेस."

राणी म्हणाली, "महाराज स्वप्न पहात असतां मला एक उत्कट इच्छा झाली, परंतु मला झालेली इच्छा अशी आहे कीं ती पुरी करणें सोपें नाहीं."

त्यावर राजा म्हणाला, "आनंद देणाऱ्या स्त्रिये, इहलोकीं जे कांहीं मानवाचे भोग असतील ते माझ्या जवळ भरपूर आहेत. मी तुझी इच्छा पुरी करतों."

"महाराज, माझी इच्छा पुरी करण्यास कठिण आहे. ती आतां मी सांगत नाहीं. पण आपल्या राज्यांत जितके म्हणून शिकारी असतील त्या सर्वांना एकत्र जमवा—त्यांच्या समोर मी माझी इच्छा सांगेन."

राजानें 'ठीक' असें म्हणून शयनमंदिरांतून बाहेर पडून अमात्यांना आज्ञा केली, "तीनशें योजनें विस्तृत काशीराज्यांत जितके शिकारी असतील त्या सर्वांनीं एकत्र जमावें अशी दवंडी पिटा!"

दवंडीप्रमाणें शिकारी जमले व राजानें राणीला सांगितलें, "हे देवी, हे ते धनुर्विद्येंत प्रवीण असलेले कृतहस्त, विशारद, निर्भय शिकारी, त्यांना वनाचें व पशूंचें ज्ञान असून ते माझ्याकरितां जीव देणारे आहेत."

तें ऐकून शिकाऱ्यांना उद्देशून राणी म्हणाली,

"येथें जमलेल्या शिकाऱ्यांनों ऐका! सहा सुळ्यांचा पांढरा हत्ती मी स्वप्नांत पाहिला. त्याचे सुळे मला पाहिजेत, नाहीं तर मी जगणार नाहीं."

शिकारी आश्चर्यानें म्हणाले—"सहा सुळ्यांचा हत्ती आमच्या बापानें पाहिला नाहीं, आजोबांनींही पाहिला नाहीं. हे राजपुत्री, जो तूं स्वप्नांत पाहिलास तो श्रेष्ठ हत्ती कसा आहे हें आम्हांस सांग—स्वप्नांत पाहिलेला नागराज कोणत्या दिशेला आहे?"

सुभद्रेनें सर्व शिकाऱ्यांकडे लक्षपूर्वक पाहिलें आणि सर्वांमध्यें उठून दिसणाऱ्या एका दांडग्या, कुरूप—'सोणुत्तर' नांवाच्या शिकाऱ्याची निवड करून, "हा माझ्या सांगण्याप्रमाणें करू शकेल" असें राजाला सांगितलें. सोणुत्तराला तिनें नेमकी सहासुळ्यांच्या हत्तीची सर्व माहिती दिली. हत्ती कोठें आहे हें सांगितल्यावर राणी म्हणाली

"सोणुत्तरा—त्या ठिकाणीं सर्वांग [illegible]न असलेला अजिंक्य, सहासुळ्यांचा हत्ती राहतो. रथदंडासारखे सुळे असलेले व वाऱ्याच्या वेगानें चाल करून प्रहार करणारे आठ हजार बलाढ्य हत्ती त्याचें रक्षण करीत असतात. सूंसाट आवेशी फूत्कार टाकीत ते झुलत उभे असतात—वाऱ्याची थोडीही हालचाल त्यांना खपत नाहीं—त्यामुळें ते एकदम क्रुद्ध होतात—आणि तेथें त्यांनीं मानव पाहिला तर—ते त्याचें भस्म करतील — त्याचा कणदेखील शिल्लक ठेवणार नाहींत.

हें ऐकून घाबरलेला सोणुत्तर व्याकुळ होऊन राणीला म्हणाला—

"देवी, सोन्याचे, मोत्याचे, रत्नांचे, वैडूर्यांचे असे अनेक प्रकारचे दागिने राजवाड्यांत आहेत—मग हस्तिदंती दागिने तुला काय करावयाचे आहेत?—कीं तूं शिकाऱ्यांचा घात करूं पाहतेस?"

राणी म्हणाली, "हे शिकाऱ्या, मी मत्सरी व दुःखित आहे. अपमानाच्या आठवणीनें झुरत आहे. हे शिकाऱ्या, माझें एवढें काम कर, मी पांच उत्तम गांवें तुला देईन."

आणि असें बोलून, "मित्रा शिकाऱ्या, मी तो सहा सुळ्यांचा हत्ती मारवून दोन सुळे आणविण्यास समर्थ होईन अशी पच्चेक बुद्धांना दान देऊन मी प्रार्थना केली. मी स्वप्नांत केवळ पाहिलें असें नव्हे. परंतु मी केलेली प्रार्थना सिद्धीला जाणार. तूं जा, भिऊं नकोस." असें म्हणून तिनें त्याला धीर दिला. "ठीक आहे" असा सोणुत्तरानें तिच्या म्हणण्याला होकार दिला व तिला विचारलें, "तो नागराज कोठे रहातो—त्या स्थानीं तो कसा येतो? तो हत्तींचा राजा कसें स्नान करतो? आम्हीं हत्तींची हालचाल कशी ओळखावी?"

पूर्वजन्मीच्या स्मृतिज्ञानानें प्रत्यक्ष पाहिलेल्या ठिकाणाबद्दल त्याला तिनें सांगितलें.

"जवळच ती रम्य चांगल्या घाटाची, खोल पाण्याची, संपूर्ण फुललेली, भुंग्यांच्या थव्यांचे वास्तव्य असलेली पुष्करिणी आहे—तेथेंच तो हत्तींचा राजा स्नान करतो."







स्नान केल्यावर उत्पलांची माळ शीर्षावर धारण करून सर्वांग श्वेत असलेला, सुंदरीकाप्रमाणे त्वचा व अंग असलेला तो सर्वभद्र, राणीला पुढें घालून आनंदानें आपल्या सद्गृही जातो."

तें ऐकून सोणुत्तरानें सांगितलें, "ठीक, बाईसाहेब, मी तो हत्ती मारून सुळे आणीन."

राणी आनंदित झाली. तिनें त्याला हजार नाणीं देऊन "आतां घरीं जा, आजपासून आठवड्यानें तूं तेथें जाशील." असें म्हणून तिनें त्याला निरोप दिला व ती त्याच्या प्रवासाच्या तयारीला लागली. परशू, कुदळ, पहार, कोयता, त्रिशूळ इत्यादि हत्यारें तयार करून आणली—चामड्याची पिशवी, दोर, पट्टे तयार करून घेतले. लांकूड फाटा सातूच्या भाकऱ्यांची शिदोरी वगैरे प्रवासाचें साहित्य सिद्ध करून ठेवलें.

सोणुत्तर सात दिवसांनीं परत आला व राणीने प्रवासाकरितां सिद्ध केलेलें साहित्य घेऊन त्यानें राजाराणीचा निरोप घेतला. व आपल्या प्रवासाला निघाला. अनेक दिवस अनेक प्रकारच्या रानांतून मार्ग काढून अनेक नदीनाले पार करीत अनेक पहाड-पर्वत व असंख्य दऱ्या खोरीं ओलांडून सोणुत्तर सुवर्णपार्श्व नांवाच्या किन्नराचें निवासस्थान अशा उज्वलपर्वतावर चढला आणि त्यानें पर्वताच्या पायथ्याशीं पाहिलें. तेथें त्याला मेघासारख्या वर्णाचा आठ हजार पारंब्यांच्या वटवृक्षाखालीं, सर्वांग श्वेत असलेला, अजिंक्य सहा सुळ्यांचा हत्ती दिसला, रथाच्या दांड्यासारखे सुळे असलेले, वाऱ्याच्या वेगानें प्रहार करणारे आठसहस्र हत्ती त्याचे रक्षण करीत होते.

## दीपावलीकडे येणाऱ्या अनाहूत साहित्यासंबंधी



**कथा-लेख**—प्रवासवर्णनें वगैरे साहित्याची पोंच देण्यांत येते. सोबत पोस्टेज असल्यास नापसंत साहित्य परत करण्यांत येतें.

पसंत पडणाऱ्या **कवितां**संबंधी स्वीकारपत्र शक्यतों महिन्याच्या आंत पाठविण्यांत येतें. नापसंत कविता सोबत पोस्टेज असल्यास परत पाठविल्या जातात. त्यासंबंधीं निराळा पत्रव्यवहार केला जात नाहीं.

**सदरें**:—भाषा मराठीच, तिथें बदलला सांधा, माननीय व्यक्ति, [illegible] कथा रम्यः, दीपमाला, जुन्यांतलें सोनें, पाणपोई इत्यादि सदरांतील साहित्याबद्दल पत्रव्यवहार केला जात नाहीं. नापसंत साहित्य परत न करतां निकालांत काढण्यांत येतें.

**अनुवाद**:—अनुवादित कथा-चुटके-आणि उद्‌रें यांसाठीं साहित्य पाठवितांना मूळ लेखकाचा-पुस्तकाचा-मासिकाचा उल्लेख असावा. तसेंच मूळ लेखकाची वा प्रकाशकाची लेखी परवानगी लेखकाकडे असावी.

—संपादक "**दीपावली**"

तेथें त्यानें जवळच रम्य, चांगल्या घाटाची, खोल पाण्याची पुष्करिणी पाहिली. ती संपूर्ण फुलली असून तेथें भुंग्यांचे थवे वास करीत होते—तेथेंच हत्तींचा राजा स्नान करीत असे. हत्तीची गति व स्थिति व त्याची स्नानास जाण्याची वाट पाहून तो मत्सराधीन स्त्रीनें नेमलेला अनार्य (सोणुत्तर) तेथें येऊन पोहोंचला व त्यानें खड्डा खणला.

त्यानें खड्डा खणून तो फळ्यांनीं झाकला. पहाटेलाच काशायवस्त्रें धारण करून विषारी बाणासह धनुष्य घेऊन तो खड्ड्यांत उतरून लपून राहिला. व हत्तीराज खड्ड्याजवळ येतांच त्यानें एक मोठा बाण सोडला. हत्तीराज जखमी झाला; व त्यानें भयंकर मोठी आरोळी ठोकली. सर्व हत्तींनीं घोर निनाद केला. तृणकाष्ठांचा चुराडा करीत ते चोहोंकडे अष्टदिशांनां धावूं लागले.

आपल्याला बाण मारणाऱ्याला ठार करतो असा विचार करीत असतांच हत्तीराजाला ऋषी मुनींचा जणूं ध्वजच असे शिकाऱ्याचे अंगावरील काशाय वस्त्र दिसलें–आणि दुःखमग्न अशा त्याच्या मनांत विचार आला—" अरहत ध्वजाचा कोणीही नाश करूं नये!"

"जो पापी काशाय वस्त्र धारण करील तो संयम व सत्य अंगी नसलेला मनुष्य काशाय वस्त्र धारण करण्यास लायक नाहीं.

ज्यानें पाप नाहीसे केले आहे. ज्यानें चांगल्या प्रकारें धर्म आचरला आहे, ज्याच्या अंगीं संयम व सत्य आहे तोच काशाय वस्त्र धारण करण्यास लायक आहे" असें म्हणून महासत्वानें शिकाऱ्याविषयीचा राग दूर करून विचारलें. "मित्रा, मला कां जखमी केलेस? स्वतःच्या फायद्यासाठीं कीं दुसऱ्या कोणी तुला नेमलें म्हणून?

शिकाऱ्यानें त्याला सांगितले—"काशीच्या राजाची पट्टराणी सुभद्रा हिला राजघराण्यांत मोठा मान आहे. तिनें तुला पाहिले व मला सांगितलें–आणि मला सुळे पाहिजेतच असे ती मला म्हणाली."

तो वृत्तांत ऐकून "हें धाकट्या सुभद्रेचे कर्म आहे" असें जाणून, महासत्वानें मोठ्या प्रयासानें आपल्या वेदना लपवून शिकाऱ्यास सांगितले–"तिला माझे सुळे नको आहेत. मला मारण्यासाठीं तिनें तुला पाठविलें आहे. अरे माझ्या स्वतःच्या सुळ्यापेक्षां माझ्या वाडवडिलांच्या अनेक उत्तम सुळ्यांच्या जोड्या माझ्याजवळ आहेत हें त्या क्रोधाविष्ट राजपुत्रीला माहीत आहे. तिनें माझ्या वधाच्या इच्छेनेंच वैर धरलें आहे. ठीक आहे. हे शिकाऱ्या ऊठ, करवत घेऊन—मी मरण्यापूर्वी हे माझे सुळे कापं आणि त्या **क्रोधाविष्ट** राजपुत्रीला जाऊन सांग "नागो हतो, हन्द इमस्स दन्ता—" हत्ती मारला पहा हे त्याचे सुळे.

एकाद्या प्रचंड पर्वतासारखा महासत्व शांत उभा होता. सुळे कापण्याकरितां शिकारी महासत्वाजवळ गेला. परंतु त्याचे हात सुळ्यापर्यंत पोहोंचेनात. महासत्व शरीर वांकवून डोकें खालीं करून उभा राहिला. शिकाऱ्यानें महासत्वाच्या सोंडेवर पाय देऊन—कुंभावर चढून त्याच्या तोंडामध्यें करवत खुपसली. महासत्वाला वेदना होत होत्या. मुख रक्तानें भरले होते. इतका प्रयत्न करूनही शिकाऱ्याला सुळे कापतां येईनात. महासत्वानें आपल्या वेदना








लपवीत मोठ्या शांतपणें विचारलें, "मित्रा, तुला सुळे कापतां येत नाहींत ?" शिकाऱ्यानें "नाहीं." असें उत्तर देतांच महासत्वानें अवधान राखून म्हटलें—"मग मित्रा, माझी सोंड वर उचलून तींत करवतीचें एक टोक दे–मला स्वतःला सोंड उचलण्याएवढें बळ आतां राहिलें नाहीं."

शिकाऱ्यानें तसें केलें. महासत्वानें सोंडेनें करवत धरून ती आरपार चालवली आणि कोंब कापावे त्याप्रमाणें स्वतःचे सुळे कापले. नंतर ते सुळे त्याला घ्यायला लावून महासत्व म्हणाला—"मित्रा शिकाऱ्या, हे सुळे मला स्वतःला नकोसे आहेत म्हणून मी ते तुला देत आहे असें नाहीं. शक्रत्व, मारत्व ब्रह्मत्वादीच्या इच्छेनेंहि मी हे तुला देत नाहीं—परंतु या माझ्या सुळ्यांपेक्षां मला सर्वज्ञता—ज्ञानाचे सुळे लक्षपटीनें प्रिय आहेत. या पुण्य कृत्यानें मला सर्वज्ञता प्राप्त घडो. एवढीच माझी इच्छा आहे. मित्रा, तुला येथें यावयास किती काळ लागला ?"

शिकारी—"सात वर्षें, सात महिने सात दिवस."

महासत्व—"या सुळ्यांच्या प्रभावानें तूं सात दिवसांच्या आंतच काशीला पोंहोचशील." असें म्हणून महासत्वानें त्याला रक्षण देऊन निरोप दिला. निरोप दिल्यावर मोठी राणी सुभद्रा व इतर हत्ती येण्यापूर्वीच महासत्वानें प्राण सोडला.

शिकारी निघून गेल्यावर शत्रूच्या शोधांत गेलेले हत्ती शत्रू न दिसल्यामुळें परतले. त्यांच्याबरोबर थोरली सुभद्रा सुद्धां आली. क्रंदन करून महासत्वाच्या घराण्याच्या पच्चेक बुद्धांजवळ जाऊन "महाराज, तुम्हांला साहित्य पुरविणारा विषारी बाण लागून जखमी होऊन मेला, त्याच्या स्मशानदर्शनासाठीं या." असे ती म्हणाली. पांचशेंहि पच्चेक बुद्ध आकाशमार्गें येऊन माळावर उतरले. त्याक्षणीं दोन तरुण हत्तींनीं नागराजाचें शरीर सुळ्यांनीं उचलून पच्चेक बुद्धांना त्याचें वंदन करवून चितेवर ठेवले व त्याला अग्नि दिला. पच्चेक बुद्धांनीं सर्व रात्रभर स्मशानांत स्वाध्याय केला. आठ हजार हत्तींनीं स्मशानांतील आग विझवून स्नान करून, सुभद्रेला पुढें घालून आपल्या वसतिस्थानाप्रत गमन केलें.

सोणुत्तर शिकारी सात दिवसांच्या आंतच सुळे घेऊन वाराणशीला आला. सुळे राणीजवळ देऊन तो म्हणाला, "बाईसाहेब ज्या विषयींचा द्वेष तुम्हीं मनांत बाळगला, त्या हत्तीला मी मारलें. तो मेला."

राणी म्हणाली, "तो मेला हें मला सांगतोस ?"

सोणुत्तर, "तो मेला हें जाणा, हे त्याचे सुळे.

राणीने महासत्वाचे सुळे रत्नजडित पंख्यावर ठेऊन, मांड्यांवर ठेवून, पूर्वजन्मी प्रिय असलेल्या आपल्या पतीचे सुळे पहात—"अशा प्रकारच्या सुंदर हत्तीला विषारी बाणानें ठार करून सुळे कापून तूं आलास" असें म्हणत महासत्वाची आठवण काढीत असतां तिच्या हृदयांत शोक उत्पन्न झाला. तो ती लपवूं शकली नाहीं. आणि तेथेंच तिचें हृदय भंग पावलें. त्याच दिवशीं ती मरण पावली.

( या लेखाचा पुढील भाग मार्चच्या अंकांत प्रसिद्ध होईल. )

शृंगार

श्रीरंग



# सानंद दामोदर



गजानन बर्वे

**सर्ग ११ वा**

सुरुचिर अनुनयानें जिंकिले राधिकेला
अभिनव रतिरंगा साजशृंगार केला
कुसुमित सुखशेजीं जाइ श्रीरंग कुंजीं
पदरव ललनेचा घालितो गोड रुंजी
अभिनय करि भासे नीज ये पापणींत
अवखळ किती बाई सूक्ष्म संकेत रीत
निबिड वननिकुंजीं चालतां मंद मंद
करित सखि तियेशी शेजनिद्राविनोद
" लगबग चल राधे रातअंधार होई
थबकसि भयभीते ! ग जरा धीट होई "

**प्रबंध २०** ( राग-वसंत, यतिताळ )

हे मुग्धे प्रमदे राधिके !
ऐक गडे ग माझिया वचना
जिवलगा भेट मधुसुदना ॥ ध्रु० ॥

मधु बोलुनियां मथविले ग
रुसुनियां जया फसविले ग
आणिले शरण चरणा सहज रतिरमणा
जा भेट सखे मधुमथना ॥ १ ॥

अनुकूल तुजसि हरि झाला
कुंजांत लपंडावाला
पाहतो वाट अलवेला मिटुनिमृगनयना
जा भेट सखे मधुमथना ॥ २ ॥

जलधार हार कुचकुंभीं
दे कंप सहेतुक दंभी
जा हरिलागी परिरंभी
मनि अनंगतरंग उठति लाजती रैना
जिवलगा भेट मधुमथना ॥ ३ ॥

तनु सज्ज संगरा सजवी
रतिवेषें, रणदल मिरवी
हे नयन मदालस फिरवी
जयघोष दुंदुभी करिति किंकिणी रशना
•रणशिंग फुंकि मधुमथना ॥ ४ ॥









अनुक्रमणिका

पदमंद हंसगति लीना
फुटति गे बोल नुपुरांना
रुमझुमते मंजुल रशना
हे नितंबिनी स्तनभारें तनु झुलतांना
जा भेट गडे मधुमथना ॥ ५ ॥

मुरलिची मधुर रसवंती
गुंजती अली मधुवंती
पिक गाती अनंगगीती
'कुंहुं कुंहुं' करित मदहरणा, सुचवि रतिशयना
जा भेट सखे मधुमथना ॥ ६ ॥

या वायुलहरि ग बाई
डुलविती वल्लरीनाही
करपल्लव सांगति कांहीं
जा नितंबिनी जा विलंब न करी गमना
जिवलगा भेट मधुमथना ॥ ७ ॥

कळविती हळुंच 'मी आल्यें'
करकंकणरव व्रिजबाले
करनखरच स्मरशर झाले
सखि हात धरुनि लडिवाळे लज्जितवदना
जिवलगा भेट मधुमथना ॥ ८ ॥

सुमहार गुंफिला साचा
मद उतरी लावण्याचा
हरि गर्वहि मुक्तमण्यांचा
वाग्विलास जयदेवाचा सुखवी सुजना
कंठांत रुळो भवतरणा ॥ ९ ॥

**प्रबंध २० समाप्त.**

प्राणप्रिया सखि राधा मजसरसीं पाहिल का।
बोलुनियां मधुरवचें आलिंगन देइल का।
रमविल का रतिशयनीं येत मनीं मज शंका।
चिंताकुल अति माधव-भेटतरी होइल का।
आलिस तूं भेटाया—कल्पुनियां कांपतसे
पडतांना मधुरमिठी रोमांचित भासतसे
तंद्रीतच रतिलीला घामानें अंग भिजे
चाललीस सोडुनिया-दे निरोप तुज नुमजे
देहभान सुटलं ग, काय तुला सांगुं कथा
मूर्च्छा येउनि पडतो, साहते न विरहव्यथा
सावध होउनि वदतो, तळमळतो ग विरही
जागवी अचेतनास जा राधे कुंजगृहीं।

× × × ×

नयनांत भरे तम, अंजन तें, दलनीलतमालसुमा श्रवणीं
कुचचित्रित कस्तुरि चित्रलता, सुकुमार उरीं धरि कृष्णमणी
शिरिं शामसरोजिनि हार सजे, करि रात असा अभिसार निळा
परिरंभित अंग नि अंग सखे रतिलोलुप हा अंधार तुला
घननीळ नभीं सितचंद्रकला, परिधान करी शामल वसना
प्रतिबिंब मनोरम नीलसरीं लहरी लपवी जलिं चंद्रगुणा
संकेत नि कुंजलता लपवी अभिसारित आकृतिबंध तमीं
तरि सांगतसे तिमिरां विजली विझली न मुळीं तनुबंधित मी

तरुतमाल नवमंजिरि शामघन तिमिर गमे
प्रेमहेमरेखांकित, निकष काय चित्तभ्रमे
कांचनमणिरत्नकांची पीतगौरतनुकांती
तरलितकरिं कटिबंधा कलितललित एकांती
मुक्ताफलहार कंठि बाजुबंद बाहुवरी
कंकणकरिं, मणिरशना रत्नखचित् किंकिणकरी
तेज झळाळे तळपे उजळि अलंकार तमा
कुंजद्वारिं येत जशी राधिका तिलोत्तमा
पाहुनियां दारि उभा माधव, ती लाजवती
हो परती संकोचें भयभीता मंदगती
आसुसली आतुरता कामुकता कामुकती
देइ धीर चतुरसखी समजावी मंजुमती

× × ×

**प्रबंध २१ वा.** (राग-वराडी. ताल-आडव)

मंजुतर कुंजतलि केलिसदनीं
रमवि रमणास गे हसत वदनी
एकांति कांतप्रियकरा हृदयिं कवळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ ध्रु. ॥

अशोक अंकुरनवदल शामलशयना
उरिं झुलवि सुमनहार तरलनयना
होईल हरित मीलनीं हळद पिवळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ १ ॥

कुसुमचयरचितमंच कुंजगेहीं
विलस विलासिनि सुकुमार देही
हा मंचक नच वंचक होई अवेळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ २ ॥

मधुलोलुप अलिपुंज गुंजित कुंजीं
आलिंगित मधुमंजिरि घालित रुंजी
रसतरकर करि केसर कुरवाळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ ३ ॥

सुरभशीतमलयपवन मंद वाही
प्रमदे भयभीते, मदनशरा साही
विधि हृदय येतील देह जवळी
हो धीट राधिके जाइ माधवाजवळी ॥ ४ ॥

वनवल्लरिं पल्लवघन विपिन झाले
पीतस्तनसघनजघने व्रिजबाले
कटिमध्य सुखासन ललितत्रिवली,
उरतो शिकताहिन मीनजळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ ५ ॥

रवमंजुल कोकिलकुलकूजित हे
नच न्हवंत वसंत सुख क्रीडित हे
लावण्यलते शृंगारतरुतें कवळी
हो धीट राधिके जाइ माधवाजवळी ॥ ६ ॥






हसत वदनिं रुचिरतर रदनकांती
उधळित राधिके रतिरसिके एकांती
रति पुरत उरत तरि सुरत छळी
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ ७ ॥
पद्मावति सुखनिधान हे ज्याचें
छंदगुणी जयदेवहि गाइ मुकुंदाचे
नित मंगल होवो लीन चरणकमली
जा आंत राधिके जाइ माधवाजवळी ॥ ८ ॥

तव चिंतनिं रातदिनीं झुरतो विरहा सहतो स्मरक्लांत हरी
वांछित चुंबन गोड तुझे, पिउं देइ तयास सुधा अधरीं
आलिंगुनि काय मदालस ही, तुज घेइल गे अंकावरती
सुटता शर नाजुक घाय उरीं, नच सावज हे सहजीं सुटती
लंबु पापणि घेसि मिटून अशी, नयनां खुणवून पुन्हां बघतां
कां होसि भयाकुल सांग सखे, अग दास तुझा झाला पुरता
मंदस्मिता प्रसन्ना मदलोललोचना हो
पद मंद मंद ठेवी मंजीर शिंजिताही
रोमांच ये फुलोनी राधा सुवर्ण देहीं
जाई विलासिनी ती गोविंद कुंजगेहीं

**प्रबंध २१ समाप्त**

× × ×

( **प्रबंध २२ :**—वराडी राग, ताल–रूपक )
बघतां सखि चंद्रमुखी, संगसुखा ये भरती
उचंबळे प्रेमसिंधु भावतरंगावरती

**आणखी कांहीं आगळे रस**



## रं भा र स

दंभ युगाचे पायिक आम्हीं, शांतीचे सारस
देशसेविका सेवक सारे सत्याचे वारस
राजकारणीं रस ओसरला, चुरसीं लीक्षारस
आश्रमांतला रंग संपला सरला प्रीतीरस
गेलें यौवन मौजमजाही जीवन हो नीरस
भुजांत नसांत ना जोर राहिला नुरला अंगीरस
सफरीकरितां सफरचन्द तें पदयात्रा चालली
रुद्राक्षाच्या श्रृंगाराला द्राक्षें ती काबुली
गौर स्कंध यौवना हासतां सहज गळे मुखरस
पळांत ये परतून पुन्हां ही या देहाचा कस
सुकला मेवा, तरि ही दे वा घ्यावा सेवारस
कंठित जीविन एकाकी हें पिउनी रंभारस
कसा होउं मी पिता, लौकिकीं बेटा बेवारस
सांग वत्सले, कशी साजरी करूं वसूबारस

— **कोंडवा**

येतां सागर उसळे, गगनांगणिं चंद्रकला
सदनांगणिं ये राधा मिटति उठति भावकळा
उत्कंठित आतुरती विलोकितां विलासिनी
आनंदें हृदयभरे शाममदनमूर्ति गुणी
वक्षःस्थलिं वैजयंति धवलहार शोभला
कालिंदीजलिं कदंबफेन काय हासला
कोमलदलशामलतनु विकचकंज भासे
रुचिचंचल चंचरीक पाकळींत हासे
कटिबंधावरि दुकूल गौर तें विराजे
परागपीत पटलवलयिं नीलनलिन साजे
नयन विहगयुगुल भुलवि, जागवि रतिभाव उरीं
उमलति कमलें सलिलीं शरदांतिल नीलसरीं
मंदस्मित वदनकांति कुंडल ये भेटाया
भासति रक्तओठ आसुसले चुंबाया
कृष्णनील घन कुंतल सितकुसुमें गुंफियली
मेघमंडळांत जणूं चंद्रकला लपलेली
गगनतमीं उगवे हा हसत चन्द्र पुनवेचा
शुभचंदनतिलक भालिं लावियला नवलाचा
कांपवी अधीर भाव, रतिलीला आठवितां
छिनिमिनि मणितेज उजळि पुलकित हो शामलता
मणिभूषण अलंकार अंधारीं झगमगती
कुंजकुटिरिं येतां सखि राधा लावण्यवती
द्विगुणित संस्कृति संचय राधा माधव पाही
वंदुनि जयदेव कवी चरणीं कवना वाही

**( प्रबंध २२ समाप्त )**

अपांगदृष्टि नयन तुझे श्रवणपथा अनुसरती
आकुंचनि दृगपरतीं लाजुनिया थरथरती
चोरुनिया पाहताहि नच मीलन चुकले ग
इकडुनि तिकडे वळतां चलित नयन थकले ग
श्रमजलदंवबिंदुंनी गाल तुझे भिजले ग
उसळति आनंदोर्मि अधरिं हसूं सजले ग

× × ×

उगिच खाजवीत गाल, खुणवि हळुच लाजरी
सोडुनियां सखिवृंदा जाइ शयनमंदिरीं
सहचरि कलहंसींचा जातां तो उडुनि थवा
होइ धीट एकांतीं. धीर देत भ्रांत जिवा.
पाहतांच जिवलग तो स्मरतापें विकल उरीं
लाजते न लाजवती मृगनयना सुखवि हरी.

× × ×

जसा ये चालोनी द्विरदशिरिं सिंदूर भरला
रणीं लीलेनें तो गजकुवलयापीड वधिला
जयश्री ज्या लाभे, गगनजयनादें दुमदुमे
करी वर्षा हर्षे वरूनि सुरमंदारकुसुमें
असा रक्तस्नाता विजयि गजहंता भुजसदा
हरी या संसारीं दुरित, प्रिय होवो जनपदा

**सानंद दामोदर ११ सर्ग समाप्त**

## गेल्या महिन्यातील



❀ **पंडितराज जगन्नाथ**

लेखक : **विद्याधर गोखले**

( सादरकर्ते : **ललितकलादर्श** )

❀ **अल्लादिन आणि जादूचा दिवा**

लेखिका : **सौ. सुधा करमरकर**

[ सादरकर्ते : **बाल रंगभूमि** ]

# नवीं नाटकें

### पंडितराज जगन्नाथ

श्री. मो. ग. रांगणेकर यांची 'नाट्य-निकेतन' ही नाट्यसंस्था सोडल्यास श्री. भालचंद्र पेंढारकर यांच्या 'ललितकलादर्श' या नाट्यसंस्थेसारखी मराठी प्रेक्षकांची नाट्य-भूक भागविणारी दुसरी धंदेवाईक कंपनी नाहीं. दीड तपाहून अधिक काळांत भालचंद्र पेंढारकरांच्या नेतृत्वाखालीं अत्यंत बिकट आणि प्रतिकूल परिस्थितींत ललितकलेनें आपलें नाट्यसेवेचें कार्य अप्रतिहतपणें चालवलें आहे. बाळ कोल्हटकरकृत 'दुरितांचें तिमिर जावो' हें नाटक म्हणजे गेल्या दोन तपांतील एक अत्यंत यशस्वी नाटक. पेंढारकर हे नवनाट्यवादी नाहींत, पण जातिवंत नाट्य-प्रेमी आहेत. अस्सल असे नवे नवे प्रयोग करण्यास ते सदैव उत्सुक असतात आणि त्यामुळेंच गेल्या महिन्यांत त्यांनीं विद्याधर गोखले यांचें पंडितराज जगन्नाथ हें ऐतिहासिक कविचरित्रात्मक नाटक मोठ्या धाडसानें प्रेक्षकांना सादर केलें.

या धाडसांत लेखक आणि नाट्यसंस्था या दोघांचा समसमान वांटा आहे. लेखकाचें धाडस असें कीं जगन्नाथ पंडिताच्या चरित्रावर मराठी प्रेक्षकांचा आणि नाट्यसंस्थेचा वकूब ओळखून त्याप्रमाणें नाटक लिहिणें म्हणजे एक प्रकारची तारेवरची कसरत होती. ऐतिहासिक नाट्यलेखकावर अनेक बंधनें असतात. सर्वपरिचित कथानक असलें तर त्याला स्थलकाल, व्यक्ति यांचीं बंधनें राखून इतिहासाशीं जास्तींत जास्त इमान राखावें लागतें आणि त्यामुळें जादा नाट्यमयता निर्माण करण्याच्या प्रयत्नाला आपोआप मर्यादा येतात. वास्तविक पाहातां जगन्नाथ पंडिताच्या चरित्रांत फारसें नाट्यमय अगर संघर्षात्मक कांहींच नसतांना त्यावर नाटक लिहिणें खरोखरच कठिण होतें. तथापि विद्याधर गोखले यांनीं आपली जबाबदारी अपेक्षेहून अधिक यशस्वीरीत्या पार पाडली आहे. विशेषतः त्यांचें संस्कृत आणि उर्दू भाषांवरील असामान्य नैपुण्य त्यांच्या साहाय्याला धावून आलें आणि त्यांतून एक रंगदार आलिशान नाट्यमय कविचरित्र साकार झालें.

लेखकाच्या पांडित्याचा आणि नाट्याचा यथायोग्य आविष्कार करण्यांत श्री. भालचंद्र पेंढारकर यांनीं कमालीचे परिश्रम घेतले आहेत. मला वाटतं आजकाल कित्येक दिवसांत मराठी रंगभूमीवरच्या ऐतिहासिक नाटकांत इतकें झगझगीत, डोळ्यांना दिपविणारें आणि इतिहासाशीं इमान राखणारें नेपथ्य दिसलेलें नाहीं. चित्रकार गोडसे आणि पु. श्री. काळे यांनीं पहिल्या अंकांत तर साक्षात् शाहीमहाल उभा केला आहे. मोंगल काळांतील पोशाखाचें यथातथ्य दर्शन याच नाटकांत प्रथम घडतें. विशेषतः शहाजहान आणि पंडितराज जगन्नाथ यांचे पोशाख नेपथ्यकाराच्या अत्यंत सूक्ष्म ऐतिहासिक प्रचीति आणून देणारे आहेत. विशेषतः प्रत्येक पात्राच्या पोशाखांतील आणि इतर सजावटींतील रंगयोजना डोळ्यांचे पारणें फेडणारी आहे.

या नाटकाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे हें नाटक फार परिश्रमपूर्वक बसवलें आहे. प्रयोग कसा घोटून बसला आहे. यांतील प्रत्येक पात्र आपली भूमिका समजून आणि विलक्षण संयमानें करतें. भूमिकेच्या दृष्टीनें पहिलाच क्रमांक लावायचा असेल तर भालचन्द्र पेंढारकर यांचा प्रथम उल्लेख करावा लागेल. पेंढारकरांना अनुकूल शरीरयष्टी नाहीं, आणि कवीची भूमिका करायला अनुकूल अशी प्रवृत्ति नाहीं. तरीपण विद्याधर गोखल्यांनीं कसोशीनें सादर केलेली पंडितराजाची भूमिका त्यांनीं यथायोग्य साकार केली आहे. इतकी अवघड भूमिका पेलणारा पेंढारकरांइतका समर्थ गायक नट आज तरी आपल्याकडे नाहीं. याच नाटकांत प्रसाद सावकार एक शानदार भूमिका करतात आणि बहारीचें गातात पण त्यांनाहि ही पंडितराजाची भूमिका मुळींच पेलली नसती असें मला तरी वाटतें. नटवर्य मामा पेंडसे हे कसलेले नट आहेत आणि त्यांनीं शहाजहानची भूमिका अप्रतिम केली आहे. मोंगलसम्राटाची करारी आणि हुकमी वृत्ति, कर्तव्य आणि प्रेम यांचा संघर्ष या सार्‍या भावभावना त्यांनीं सादर करण्यांत मुळींच कसूर केलेली नाहीं. नाटकाची नायिका लवंगिका हिचें काम मंगला



अनुक्रमणिका








संझगिरी यांनीं अत्यंत रेखीवपणें केलें आहे. शंकर घाणेकर यांचे विनोदी काम नेहमींच्या थाटांत आणि त्यांच्या पूर्वापार लौकिकाला साजेसें आहे. मात्र त्यांच्या भूमिकेचें यश बरेचसें विद्याधर गोखल्यांच्या उर्दू शायरीनीं चमचमणाऱ्या संवादांना आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. चित्तरंजनसारखा मोहरी दाराशुकोसारख्या एका मामुली भूमिकेवर खर्ची कां घातला हें कळावयास मार्ग नाहीं.

पंडितराज जगन्नाथ हें एक नयनमनोहर काव्य आहे. आणि तें काव्य यथार्थतेनें सादर करण्याचें अवघड कार्य केल्याबद्दल लेखक विद्याधर गोखले आणि नटवर्य पेंढारकर यांचें अभिनंदन.

— बाळ सामंत

## अल्लादिन आणि जादूचा दिवा

गेल्या महिन्यांत सौ. सुधा करमरकरांच्या नेतृत्वाखालीं भारतीय विद्याभवनांत बाल-रंगभूमीच्या १९६० सालच्या नियोजित कार्यक्रमाप्रमाणें ‘ अल्लादिन आणि जादूचा दिवा ’ या नाट्याचा प्रथम प्रयोग झाला. प्रस्तुत प्रयोगास कांहीं थोड्याशा आमंत्रित प्रौढांखेरीज जवळजवळ सर्व थिएटर उत्साही, चिकित्सक आणि गडबड्या छोट्या प्रेक्षकांनीं गच्च भरून गेलें होतें हेंच ह्या उपक्रमाचें सर्वांत मोठें यश मानतां येईल. मुलांमध्यें उपजतच अनुकरण करण्याची प्रवृत्ति जशी असते, त्याचप्रमाणें अननुभूत प्रसंगांचा चिकित्सक बुद्धीनें आणि कुतुहलपूर्ण मनानें आस्वाद घेण्यासाठीं त्यांची धडपड चालू असते. ह्या त्यांच्या मनःप्रवृत्तींना बाधक वळण लागूं नये यासाठीं प्रौढांसाठीं निर्मित केलेलें वाङ्मय, बोलपट अथवा नाट्यकृतींच्या परिसरांत त्यांचें पाऊल घोटाळणार नाहीं अशी खबरदारी घेणें अवश्य असतें. पण आजकाल प्रौढांच्या हौशी युगांत असले मायावी आणि थिल्लर उपक्रम वारंवार चालूं असतांना मुलांना टाळून अथवा निराश करून कुटुंबांतील प्रौढांना आपली हौस भागवणें दुष्कर ठरतें. ह्या दृष्टीनें सौ. सुधाताईंची बालरंगभूमीची योजना विशेष स्वागतार्ह वाटते. स्वतः सुधाताईंना आणि त्यांच्या भगिनी ललितातार्इंना बालपणापासूनच रंगभूमीचें व नाट्यकलेचें वेड फार, त्यांनीं कॉलेजांत व हौशी आणि धंदेवाईक रंगभूमीवर अतिशय तन्मयतेनें व यशस्वितेनें भूमिका करून रसिक जनतेकडून वाहवा मिळविली आहे. विवाहानंतर सुधाताईंनीं आपले हौशी व नाट्यप्रिय पति श्री. सुधाकर करमरकर यांच्यासह केलेल्या परदेशच्या दौऱ्यांत पाश्चात्य बालरंगभूमीचें चिकित्सकपणें निरीक्षण केलें व परतल्यावर अनेक अडचणी असतांना व निरुत्साही वातावरणांत देखील आपली बालरंगभूमीची योजना साकार करून दाखविली याबद्दल त्यांना धन्यवाद देणें इष्ट ठरेल. प्रथम छोटे छोटे प्रयोग बसवून त्यांना छोट्या रसिकांचें उत्तेजन आणि आश्रय अनपेक्षित मिळतो आहे हें पाहून त्यांनीं बालरंगभूमीला व्यवहार्य व सांघिक स्वरूप दिलें. तसेंच सार्वजनिक संस्थेची बैठक बसविण्यासाठीं सभासद करण्याची योजना तयार करून आपल्या उपक्रमांना आर्थिक व प्रयोगक्षम सहकार्य मिळविलें. ह्या नवीन योजनेखालीं गेल्या एप्रिलमध्यें त्यांच्या नाट्यसंस्थेनें ‘ कळलाव्या कांद्याची कहाणी ’ हा वैचित्र्यपूर्ण रम्य नाट्यप्रयोग सादर करून मुहूर्तमेढ रोवली. त्यानंतरहि या नाट्याचे हाऊसफुल्ल प्रयोग अनेकवेळां सादर झाले. त्याकार्यक्रमाच्या वेळीं छोट्या प्रेक्षकांना दिलेल्या अभिवचनाला जागून अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत देखील सुधाताईंनीं हा दुसरा तितकाच रम्य पण अधिक कठीण असा नाट्यप्रयोग ठरलेल्या मुदतींत सादर करून आपल्या संस्थेच्या प्रतिष्ठेला सबळ केलें.

‘ अल्लादिन आणि जादूचा दिवा ’ हें नाट्य स्वतः सुधाताईंनीं लिहिलें असून पूर्वीप्रमाणें दिग्दर्शनहि त्यांचेंच आहे. अल्लादिनची कथा बालमनाला परिचित अशी असली तरी तिचें चिरंतन आकर्षण अधिक वाढविण्यासाठीं सुधाताईंनीं विशेष परिश्रम व सूक्ष्म संयोजन करून उपस्थित बालरसिकांना अक्षरशः भारावून टाकलें. पाहिला प्रयोग असूनहि नेपथ्य, तांत्रिक दृश्यनिर्मिती व चमत्कृतिजन्य पार्श्वसंगीत यांचा एकत्रित परिणाम यशस्वी झाला हें श्रोत्यांच्या उत्स्फूर्त टाळ्यांतून ध्वनित झालें. नाटकाची भाषा सुलभ व चटकदार ठेवूनहि पात्रांच्या पेहेरावाला अनुकूल अशा पर्शियन शब्दांचा संवादांतला वापर विशेष स्वाभाविक वाटला. रंगमंचावरील बदलते देखावे आणि त्याला अनुकूल अशी प्रकाशयोजना, विशेषतां गुहेचा देखावा आणि त्यांतले किलबिलणारे दिवे यांनीं घडत असलेल्या नाट्याचा यशस्वी परिपोष केला. प्रयोगांतल्या भूमिकांची रंगभूषा व वेषभूषाहि नाट्याच्या काळप्रसंगाला प्रस्तुत अशी वैचित्र्यपूर्ण पण स्वाभाविक योजण्यांत सुधाताईंचे व त्यांच्या सहकाऱ्यांचे अभ्यासपूर्ण परिश्रम दृष्टीस प्रतीत होतात. नाट्यप्रयोगांतील पात्रयोजना भूमिकांस सुयोग्य अशी असूनहि दिग्दर्शनाचे बारकावे व संवादाचे सांघिक सहकार्य कोठेंहि आणि कुणीहि तोकडे पडूं दिलें नाहीं हें विशेष कौतुकास्पद आहे. दुसऱ्या अंकांत शहाजादीच्या हातांतला दिवा काढून घेण्यासाठीं धडपडणाऱ्या जादूगाराच्या व त्याच्याकडे पाठ करून समोरील दृश्य पहाणाऱ्या अल्लादिन आणि शहाजादीच्या सहज हालचाली, तसेंच तिसऱ्या अंकांत आफ्रिकेंतल्या महालांत अर्धवट बेहोष अवस्थेंत अल्लादिनावर झडप घालणाऱ्या जादुगाराची व अल्लादिनाची झटापट आणि त्याची खिडकींतून बाहेर पडलेली उडी इत्यादि प्रसंग बालमानसशास्त्राचे यशस्वी आडाखे ओळखून श्रोत्यांची उत्कंठा पराकोटीला पोहोंचेल अशा तऱ्हेनें दिग्दर्शित करून सुधाताईंनीं आपली नाट्यतपस्या जणुं पणालाच लावली आहे. भूमिका सर्वांच्याच चांगल्या झाल्या असें वाटूनहि अल्लादिन, त्याची आई, सुलतान व जादूगार यांचा खास उल्लेख करणें प्राप्त आहे. ह्या नाटकाच्या पुढील प्रयोगांस संवयीनें अधिक सफाई चढून ते अधिक परिणामकारक ठरतील यांत संशय नाहीं. सुधाताईंच्या परिश्रमांचें सर्वांगीण चीज होत आहे असें ध्वनित करणारे हाऊसफुल्लचे दरवाजावर झळकणारे फलक हेच ह्या संस्थेचे उज्ज्वल भवितव्य सुचविणारी प्रसादचिन्हें आहेत असें म्हटलें तर तें अतिशयोक्त ठरणार नाहीं.

—शां. शं. रेगे

• • •






गतवर्षीचें साहित्यकारण • बा. भ. बोरकर • महर्षी टॉलस्टॉय • चिं. ग. कर्वे • सलामीचे लक्षवेधक प्रदर्शन • गेल्या वर्षातील मराठी राजकारण • महाराष्ट्राचे समाजकारण • बँक ऑफ महाराष्ट्र • गत वर्षातील शिक्षण

## साहित्य

### गतवर्षीचें साहित्यकारण

संयुक्त महाराष्ट्राच्या आगमनानें मराठी भाषा आणि साहित्य यांना सरकार दरबारीं मानाचें स्थान मिळेल अशी जी आशा होती ती फलद्रूप होण्याचीं चिन्हें गेल्या वर्षात दिसलीं. महाराष्ट्राची राज्यकारभाराची भाषा मराठी असणार असें सरकारनें जाहीर करून त्यासाठीं डायरेक्टोरेट ऑफ लॅंग्वेजेस या खात्याची स्थापना केली आहे.

गेल्या वर्षांत सरकारनें भावार्थ रामायण, दासबोध आणि नामदेवाची अभंग गाथा यांच्या प्रचारासाठीं समित्या नेमून आपली योजकता व्यक्त केली. याशिवाय कवि यशवंतांना लोककवि हें मानपद, तसेंच महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळाची स्थापना इत्यादि घटना म्हणजे मराठी वाङ्मयाच्या प्रगतीच्या दृष्टीनें मोठ्या अभिमानस्पद घटना.

सरकारी प्रयत्नांची वाटचाल चालू असतां मराठी साहित्यांतील ग्रंथप्रकाशन आणि इतर साहित्यनिर्मिति याबाबत लक्ष वेधून घेणाऱ्या घटना फारशा झाल्या नाहींत. महाराष्ट्राच्या साहित्यिक जीवनांत वार्षिक मराठी साहित्य संमेलनाची पूर्वीची ती प्रतिष्ठा लोपली असल्यामुळें निवडणुकीचें, चुरशीचें राजकारण सोडल्यास या वार्षिक संमेलनांचें औत्सुक्य आणि उपयुक्तता आतां ओसरली आहे. मिरज येथील भरलेल्या साहित्य-संमेलनाची दैना अजूनहि लोक विसरले नाहींत. त्यांतील कांहीं व्यवहार तर आतां पोलिसांच्या पर्यंत गेले आहेत.

गेलें वर्ष कादंबरी, नाट्य आणि कथा या प्रांतांत सामसूम होती. रणजित देसाई यांची बारी, आणि दत्त रघुनाथ कवठेकर या मातबरांच्या कादंबऱ्या त्यांचा आकार आणि भरमसाट किंमत यामुळेंच लक्षांत राहिल्या. पण मराठी मनाचा वेध घेतला नाहीं त्यांनीं ! कथाप्रांतांत तर आतां घसर-गुंडीच चालू आहे. नवकथांचें नावीन्य ओसरलें आणि सामर्थ्य लोपलें. मातबर आघाडीवरचे मोहरे वाढत्या वयानें कीं काय निष्प्रभ झाले आणि त्यांची नक्कल करणारे नवथर तर फारच खुजे वाटले.

नाट्यक्षेत्रांत फार्सला बरे दिवस आले. पण त्यानें अखेर अचरटपणाची मजल गांठली. गेल्या वर्षातील उल्लेखनीय नाट्य-लेखन विद्याधर गोखले या तरुण नाटक-काराचें. त्याचें सुवर्णतुला आणि पंडितराज जगन्नाथ या नव्या नाटकांनीं नवी आशा निर्माण केली ! गेलें वर्ष नवनाट्याला फारसें उत्साहजनक गेलें नाहीं.

नवकथेप्रमाणें नवकाव्याचें स्तोम कमी झालें. मर्ढेकरांचे निशाण पूर्वीपेक्षा अधिक डौलानें फडकेल ही आशा खोटी ठरली. शेवटीं या मंडळींच्या मर्यादा स्पष्ट झाल्या. मराठी मनाची पकड घेईल असें ठसठशीत काव्य अगर कवि अजूनतरी जन्माला याय-चाय. नाहींतर आजकाल सर्वसामान्य वाचक कवितेचे पान न वाचतांच पुढचें उलटतो असें अनुभवास येतें.

गेल्या वर्षात लक्षांत राहाण्यासारखीं पुस्तकें पु. ल. देशपांडे यांचें 'अपूर्वाई' वसंतराव देसाई यांचें 'बालगंधर्व,' विद्याधर गोखले यांचें 'पंडितराज जगन्नाथ.'

### पन्नाशीत (यौवनांत) पदार्पण करणारे

## कविवर्य बोरकर

दीपावलीचे हितचिंतक व आमचे प्रियमित्र कविवर्य बाळकृष्ण भगवंत बोरकर यांचा पन्नासावा वाढदिवस मौज, साधना व पॉप्यु-लर या तीन प्रकाशन संस्थांनी पुणें येथें थाटानें साजरा केला. या प्रसंगीं या तिन्हीं संस्थांनीं श्री बोरकरांची चार मराठी व दोन कोंकणी अशीं सहा पुस्तकें प्रकाशित केली.

गोमंतकानें जे कांहीं प्रथम श्रेणीचे प्रतिभा-वंत महाराष्ट्राला दिले, त्यांत कविवर्य बोरकरांचा समावेश होतो. कवितेप्रमाणें कथा–कादंबरींतहि बोरकरांनी आपलें असें स्वतंत्र स्थान निर्माण केलेलें आहे. अगदीं सामान्य गोष्टीचासुद्धां आस्वाद कलात्मक दृष्टीने घेणें, साध्या विषयांत देखील मोठा आशय शोधणें, संस्कृतीच्या मुल्यांशीं निष्ठावंत राहाणें इत्यादि गुण बोरकर यांच्यांत प्रकर्षानें दिसून येतात. आंगिकारलेल्या साहित्यक्षेत्रांत बोरकर अत्यंत प्रामाणिक आहेत. आणि हा प्रामाणिकपणाच त्यांच्या चिरयौवनाचें द्योतक असावें. बोरकरांना उत्तरोत्तर आयुरारोग्य लाभो व त्यांचा महाकाव्याचा संकल्प पुरा होवो हीच प्रार्थना !

### महर्षि टॉलस्टॉय

गेल्या नोव्हेम्बर महिन्याच्या २० तारखेस महर्षि टॉलस्टॉय यांची पन्नासावी पुण्यतिथी सर्वत्र साजरी झाली. आणि त्या निमित्तानें झालेल्या व्याख्यानांतून, परिसंवादांतून, स्मृति-



अनुक्रमणिका

लेखांतून आणि खास अंकांतून टॉलस्टॉय यांच्या साहित्यिक आणि सामाजिक कतृत्वाचा परिचय जनतेला झाला. महाराष्ट्रीय वाचकांना के. रा. पुरोहितांच्या 'शून्य जगत्' व 'आकाश पुष्प' ह्या कादंबऱ्याद्वारें टॉलस्टॉयचा परिचय अनेक वर्षांपूर्वी झाला असला तरी रूक्ष व नीरस शैलीमुळें ह्या कादंबऱ्या भाषांतरित नसून लेखकाच्या स्वतंत्र असाव्यात असें वाचकांना वाटून त्यांकडे दुर्लक्ष झालें. आपल्याकडे कुणी होतकरू लेखक लेखणी सरसावून बसला तर गॉर्की, चेकॉफ या रशियन कथालेखकांबरोबर टॉलस्टॉयचाहि समाचार घेण्यास कचरत नाहीं हें अधूनमधून संकलित व स्वतंत्र स्वरूपाच्या नियतकालिकांच्या अंकांतून अनेक वेळां दृष्टोत्पत्तीस आलेलें आहे. अशाच तऱ्हेनें एका साहित्यिक बैठकींत विशेष भलामण केलेली ऐकून मला अर्थानिंलित लेखकानें ग्रंथालयें धुंडून टॉलस्टॉयच्या कथा वाचल्या व त्यावर एका छोट्या अभ्यासमंडळांत व्याख्यानहि दिलें. पण श्रोतृवर्गापैकीं एका जागृत विद्यार्थ्याला टॉलस्टॉयच्या कांहीं कथांची गफलत झाल्याचा संशय येऊन व्याख्यानानंतर त्यानें सदरहू व्याख्यात्याची तांट घेतली व टॉलस्टॉयबद्दल कुतुहल दर्शविलें. व्याख्यात्यानें हातांतून आणलेलें पुस्तक त्या अभ्यासकाच्या पुढें करतांच मुखपृष्टावरील अलेक्झी टॉलस्टॉय हें नांव पाहून त्याला सर्व उलगडा झाला, कांहीं का होईना टॉलस्टॉयच्या कानावर पडलेल्या नामसंकीर्तनानें दुसऱ्या टॉलस्टॉयच्या वाङ्मयाचें परिशीलन झालें हा काय थोडा फायदा!

काउन्ट लियो टॉलस्टॉय ह्यांचा आज आंतरराष्ट्रीय जगतांत जो विशेष गाजावाजा झाला आहे तो केवळ त्यांच्या ललित लिखाणामुळें नव्हे तर ते एक महान् विचारवंत होते म्हणून. रशियांतील क्रांतिकारी विचारप्रणालीला टॉलस्टॉय यांनीं एक निराळेंच वळण लावलें. त्यांच्या साहित्यांत तत्कालीन जीवनाचें यथार्थ चित्रण आढळलें तरीसुद्धां त्यांनीं वर्णन केलेलीं समाजाची सुखदुःखें व घडण ही प्रादेशिक वे अल्पजीवी न टरतां शाश्वत मूल्यांचा पाठपुरावा करणारीं अतएव चिरंतन अर्थी टरून अजूनहि आधुनिक वाटतात. टॉलस्टॉयचें वाङ्मय विविधत आणि विस्तार या बाबतींत व्यापक टरलेलें आहे. तशीच त्यांत प्रतीत झालेली त्यांची सहिष्णु वृत्ति व उदार दृष्टिकोन यामुळें त्यांचे वाङ्मय अजूनहि दिलासा देतें. भारताच्या दृष्टीनें टॉलस्टॉयची महति विशेष आहे. याचें कारण ते कट्टर अहिंसावादी होते व अशाच तऱ्हेनें पण निराळ्या पातळीवर कार्य करीत असलेले महात्मागांधी यांच्याबद्दल त्यांना तुसेंचे गांधींनाहि त्यांच्याबद्दल आकर्षण वाटलें ह्याचें कारण दोघांची मिळतीजुळती विचारप्रणाली. ज्यांनीं 'मानवतेचें मंदिर' घडवलें अशा जगतांतल्या थोर द्रष्ट्यांमध्यें टॉलस्टॉय ह्यांची गणना होते. आणि म्हणूनच ही त्यांची पन्नासावी पुण्यतिथि मोठ्या उत्साहानें भारतात साजरी झाली.

**— सारस्वत**

### चिं. ग. कर्वे

गेल्या महिन्यांत सुविख्यात साहित्यिक श्री. चिं. ग. कर्वे यांचें झालेलें आकस्मिक निधन म्हणजे महाराष्ट्रांतील व्यासंगी पुरुषांच्या कमतरेतेंत पडलेली आणखी एक भर. ज्ञानकोशकार केतकरांचे सहकारी या नात्यानें कर्वे महाराष्ट्राला ज्ञात झाले. प्रसिद्धीच्या अगर कोणत्याहि कंपूच्या नादीं न लागतां अव्याहत ज्ञानार्जन आणि लेखन करण्याचें जणूं त्यांनीं व्रतच घेतलें होते. नुकतेंच आपटे यांच्या संस्कृत कोशाचें काम त्यांनीं पूर्ण केलें आणि शिवाय मुंबई सरकारच्या लोकसाहित्यप्रकाशन समितीचें अध्यक्षपदहि भूषविलें. कर्वे हे खाजगी जीवनांत एक अत्यंत सात्विक आणि शिस्त म्हणून प्रसिद्ध होते.

त्यांच्या निधनानें मराठी वाङ्मयाची फार हानि झाली आहे.



### सलामीचें लक्ष-वेधक प्रदर्शन

डिसेंबर महिन्यांत मुंबईत हवा चांगली असते. आरोग्यहि थोडें बरें असतें. त्यामुळें पोरांबाळांना घेऊन 'फावल्यावेळीं' फिरायला जाणें, जातां जातां गर्दीच्या ठिकाणीं सहज डोकावणें, सुलभ असलें, तर त्यांतल्यात्यांत मौज लुटणें सोईचें वाटतें. मुंबईतलीं सार्वजनिक हितासाठीं (जबरदस्त भाडीं घेऊन) मोकळीं ठेवलेलीं बहुतेक सर्व सभागृहें एकतीसहि दिवस या ना त्या कारणानें भरलेलीं असतात. फोर्टमध्यें असलेली जहांगीर आर्ट गॅलरी देखील गेला महिनाभर एकहि दिवस मोकळी नाहीं. इथें मात्र गर्दी थोडीशी विरळ असते त्यामुळें या आर्ट गॅलरीमध्यें सहकुटुंब सहपरिवार घुसून तासभर सहज नयनसुख घेतां येतें.

या महिन्याच्या सलामीलाच इथें तरुण चित्रकार यशवंत माळी यांचें 'कांहीं व्यक्तिदर्शनांचे' तैलचित्रांचें प्रदर्शन भरलें होतें. श्री माळी यांच्यावर कांही पाश्चात्य चित्रकारांच्या कलाकृतींचा विलक्षण परिणाम झालेला दिसला. कुठें एखाद्या चित्रांत 'पिकासो' डोकावे तर कुठें 'मॅनेट' या चित्रकाराची (उंचच उंच आकृति दृष्टि वेधून टाकी. 'पर्शियन ब्लू' व 'ऑरेंज' हे दोन रंग, माळी यानीं प्रत्येक कलाकृतींत थोडेसे उधळून वापरलेले आहेत; परंतु त्यांचें प्रमाण चुकलेलें नाहीं. मांडणींत व रेखाटनांत प्रगल्भता किंचित कमी वाटली तरी एकंदर आलेखन थिटें वाटत नाहीं. कांहीं रेखाटनें स्वतंत्र बुद्धीचीं आहेत, व तीं चट्कन् लक्ष वेधून घेतात. माळी यांचे भावी यश उज्ज्वल आहे, असें हीं त्यांचीं स्वतंत्र चित्रें सांगतात.

श्री. माळ्यांच्या नंतर एकदम तीन चित्रकारांनीं आपापलीं प्रदर्शनें वेगवेगळ्या दालनांत भरवलीं. हीं प्रदर्शनें श्री. करकरे, श्री. बद्रीनारायण व श्री. देवळालीकर यांचीं होतीं. श्री. करकरे हे बॉम्बे आर्ट सोसायटी या संस्थेंत शिपायाची नोकरी करतात. अर्थात 'गवयाच्या पोरानें देखील सुरांत रडावें' या न्यायानें चित्रकलेचें वारें करकरे या तिथल्याच शिपायाच्या अंगांत शिरणें स्वाभाविक होतें. कौतुक वाटलें तें त्यांच्या एकहाती प्रदर्शन भरवण्याच्या धाष्ट्याचें. श्री. करकरे यानां यापूर्वी बॉम्बे आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनांतून बक्षिसेंहि मिळालेली आहेत. अनेक चित्रांची प्रसूति या व्यतिरिक्त श्री. करकरे यांच्या प्रदर्शनांत दुसरी कसली अनुभूति होत नाहीं. त्यांना प्रेरणा झालेली आहे. त्या प्रेरणेवर त्यानीं खूप विचार केला पाहिजे. व्यासंग केला पाहिजे......

बद्रीनारायण यांचीं कांहीं बालीश रेखाटणें अगदींच सामान्य होतीं. 'मुलांच्या चित्रकलेचा' त्यांचा अभ्यास मात्र दांडगा

आहे. हेंच त्यांच्या प्रदर्शनांत आढळून आलें. राजवैभव दाखवणारीं कांहीं आलेखनें विशेष नजरेंत भरलीं. गेल्या कांहीं वर्षांपेक्षां त्यांचें यंदाचें प्रदर्शन प्रगतीचें वाटलें.

तिसरें प्रदर्शन देवळालीकरांचें. वरील दोघांत देवळालीकर उठून दिसले. त्यांच्या चित्रांत साधनेची झांक आढळली. या चित्रकारानें अभ्यास आणि विचार या दोन्हीं बाबतींत लक्ष घातलेलें दिसलें. कांहीं पाश्चात्यांचाहि त्यांच्यावर परिणाम झालेला दिसतो; पण त्यांच्या स्वतंत्र विचारांच्या पगड्यानें तो झांकून गेलेला दिसतो. 'दोन घोडे' 'गणपति' अशीं चित्रें वरील आविष्कार करतात. देवळालीकरांची रंगसंगति त्यांचा जबरदस्त व्यासंग दाखवते. तें वरील दोन चित्रकारांत अजिबात आढळलें नाहीं.

### दहा चित्रकारांचें भयानक प्रदर्शन

दहा मद्रदेशीय चित्रकारांनीं पन्नास–साठ चित्रांचें एक प्रदर्शन गेल्या पंधरवड्यांतच भरवलें होतें. या सर्व चित्रांत 'भयानक' हा नवरसांतला एक रस अधिक उठून दिसत होता त्यामुळें प्रदर्शन बघून बाहेर येणाऱ्या कुटुंबांच्या चेहेऱ्यावर भीतीची छाया पडलेली दिसत होती. मुंबईंत कांहींहि खपतें असा या मद्रदेशीय चित्रकारांचा ग्रह झालेला असावा. (त्यांचें एकहि चित्र खपलें नाहीं; दुर्दैव.) तात्पर्य, अशा वेळीं जहांगिर आर्ट ग्यालरीमध्यें शुकशुकाट असतो.

**— गोपालन्**



### गेल्या वर्षातील मराठी राजकारण

गेल्या वर्षातील महाराष्ट्राच्या राजकीय जीवनांत वर्षारंभापासूनच संयुक्त महाराष्ट्राचे वेध लागले असल्यामुळें १९५९ मधील राजकीय तीव्रता आणि संघर्ष झपाट्यानें कमी झाला. मराठी मनांत सांचलेलं वैषम्य आणि विकल्प अल्पावधींतच दूर झाले आणि साऱ्या मराठी जनतेनें नवमहाराष्ट्राच्या जन्माचा सोहळा मोठ्या उत्साहानें आणि आनंदानें साजरा केला. या संयुक्त महाराष्ट्राच्या आगमनाचें श्रेय कुणाला याबद्दलहि बरीच भवति न भवति झाली. संयुक्त महाराष्ट्र समिति, आचार्य अत्रे यांचा झुंजार प्रचार आणि यशवंतराव चव्हाणांचें समंजस राजकारण या तीन कारणांनीं नवा महाराष्ट्र लवकर जन्माला आला हें सत्य सर्वांनींच अखेर मान्य केलें. संयुक्त महाराष्ट्राच्या उद्घाटनाप्रसंगीं शिवाजीपार्क आणि चौपाटी या ठिकाणीं भरलेल्या विराट सभा आणि सरकारी आणि खाजगीरीत्या झालेले सांस्कृतिक कार्यक्रम कुणींच विसरणार नाहीं असे अभूतपूर्व झाले. मात्र उद्घाटनप्रसंगीं पं. नेहरूंचें भाषण तितकेंच निराशाजनक झालें. अजूनहि पंडितजींनीं मराठी माणसाचं मन ओळखलेलं नाहीं आणि मराठी माणसाबद्दल त्यांना फारसें प्रेम नाहीं असेंच या भाषणावरून सर्वांना वाटलें. विशेषतः आपल्या भाषणांत त्यांनीं विदर्भामधील जनतेच्या असंतोषाचा जो उल्लेख केला तो अप्रस्तुत आणि अनौचित होता.

यामुळें विदर्भांतील स्वतंत्र विदर्भाच्या



## तया जिंकिलें तूंच मृत्युंजया

— राजा बढे

पुढें दाट अंधार या काजळ्यांच्या जरी मागुनी तेज कोंदाटलें
मनीं चांदणें घातकी चोरट्यांच्या, अहंकार आभाळ तें फाटले
घराभीतरीं धूर्त हे पेटवीती उजेडास आतंक दावानल
कोल्हेकुईनेच कीं वाढवीती अहिंसाव्रती राष्ट्रसेनाबल

निशाधुंद अस्मान सुल्तान हा चांद सत्तामदें कीं पुरा मातला
छळाया प्रजा मानवी काळरातीं भुतांचा जमे सर्व गोतावळा
करें कष्टवी भ्रष्टवी धर्मनीती कलंकास ये वाढतें वैभव
झांकावया कृष्णकृत्यें न भीती वरी शांततेचें कलाकैतव

शांतिप्रपातें तरू गारठावे अहिंसाविवर्तें झडे पालवी
दिशाभूल हो सत्यधूलीकणांनीं काळोख तेजोरवी मालवी
अस्मान झेलावया टांगली ही दिवाभीत कीं वाघळांची पिले
निस्तेज कोमेजल्या वल्लरींना फुलावी कशी पौरुषाची फुलें

सह्याद्रिच्या राजसिंव्हा निनादें तुझी गर्जना कोटि कंठांतुनी
फोडावया मत्त गंडस्थळातें किती वीरछावे निघाले रणीं
विस्फारिले निश्चयें नेत्र कोटी नि प्रस्फूरिल्या कोटि कोटि भुजा
संहारण्या हिंदुविध्वंसिनी शक्ति, रक्षावया हिंदराष्ट्रध्वजा

तुझें श्रेय घ्याया धजे धैर्य खोटें रचाया तुझ्या संचिताची चिता
चिताभस्म चर्चून भूतेच भालीं विभूतीच या भासती भारता
सह्याद्रिच्या वीर स्वातंत्र्यसिंव्हा। तुझी झेप काळावरी निर्भया
मृत्यूवरी मात केलीस धीरा तया जिंकिलें तूंच मृत्युंजया




राजकारणाला कांहीं मोठा पाठपुरावा मिळाला असें मुळींच नाहीं. विधार्णींची स्वतंत्र विदर्भाची चळवळ अजूनहि मूळ धरूं शकली नाहीं.

गेल्या वर्षांत संयुक्त महाराष्ट्राच्या आगमनामुळें महाराष्ट्रांतील संयुक्त महाराष्ट्र समितीचे तीन तेरा वाजले. अत्रे डांगे यांनीं इरेस पेटून समितीचें तारू प्रजासमाजवाद्यांच्या खडकावर फुटलें तरीहि वल्हवण्याचा निष्फळ यत्न केला, शेवटीं मुंबई नगरपालिकेंत समितीचें बहुमत गेलें आणि गेल्या महिन्यांत प्रजासमाजवाद्याच्या एका मतानें कॉंग्रेसचे किराड हे मेयरपदीं अधिष्ठित झाले. समितींतून बाहेर पडल्यावर प्रजासमाजवादीपक्ष बाळसे धरील अशी जी आशा होती ती सरकारी नोकरांच्या संपाने बारगळली. या संपाचें नेतृत्व प्रजासमाजवादी पक्षानें घेऊन अखेर सरकारी नोकरांना दातीं तृण धरून शरण यायला भाग पडलें आणि स्वतःचा फज्जा केला. लोहिया गटाची तर एका विनोदी पक्षांत गणना करावी असें त्याच्या राजकारणाचें स्वरूप झालें आहे. कम्युनिस्ट पक्षांतील आपापसातील लाथाळी यामुळें त्याचें राजकीय वजन कमी होऊं लागलें आहे. सीमा सत्याग्रहाच्या रूपानें आणि हुतात्मा स्मारकाच्या निमित्तानें समितीनें थोडाबहुत वर येण्याचा प्रयत्न केला तो यशवंतराव चव्हाणांच्या अत्यंत मुत्सद्दी राजकारणामुळें पार फसला. संयुक्त महाराष्ट्राच्या उद्घाटनाच्या काळांत यशवंतरावांनीं एस्. एम्. आणि सेनापती बापट यांच्या मांडीला मांडी लावून शनवारवाड्यासमोर भाषण केलें तेव्हांच त्यांनीं ही राजकीय शर्यत जिंकली.

गेल्या महिन्यांत यशवंतरावांनीं विदर्भात जो सदिच्छा दौरा काढला आणि त्या अगोदर डॉ. गोपाळराव खेडकर यांची महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या अध्यपदीं निवड करून विदर्भी जनतेचीं मनें जिंकण्याचा कांहींसा प्रयत्न केला. नोव्हेंबर आणि डिसेंबर या दोन महिन्यांत नागपूर येथें भरलेलें मुंबई विधानसभेचें अधिवेशन या सर्व घटनांमुळें गेलें मराठी राजकारण यशवंतरावांच्या प्रभावानें भारलें गेलें होतें हें निःसंशय. कृष्णा-गोदावरीच्या पाण्याच्या वादांत महाराष्ट्र सरकारनें घेतलेली खंबीर भूमिका, तिसऱ्या योजनेचें ३९० कोटि रुपयांचें अंदाजपत्रक केन्द्र सरकारला मान्य करायला लावण्यांत त्यांना आलेलें यश, तसेंच महाराष्ट्रांतील पाणीपुरवठा आणि जलविद्युतशक्ति यासाठीं श्री. स. गो. बर्वे यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेलें कमिशन या आणि इतर अनेक घटनांनीं संयुक्त महाराष्ट्राचीं पावलें आतां मंदगतीनें कां होईना पण कोणत्या दिशेनें पडत आहेत याचा अंदाज येतो. आणि त्यामुळें भावी वर्ष मराठी राजकारणाच्या दृष्टीनें अधिक यशदायी होईल असा विश्वास वाटतो.




## महाराष्ट्राचें समाजकारण १९५९ ते ६०

संयुक्त महाराष्ट्र आल्यावर महाराष्ट्र सरकार दारूबंदी उठवील अशा अफवा सर्वत्र उठवल्या जात होत्या. वास्तविक पाहातां दारूबंदीचें धोरण फसलें आहे हें कॉंग्रेसच्या आंतरिक गोटांत मान्य आहे. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. संजीव रेड्डी यांचेंहि मत दारूबंदीला अनुकूल नाहीं. दारू मोकळी असतांना चोरटी दारू होतीच पण आतां तिचें प्रमाण फारच वाढले आहे. आज मुंबईसारख्या शहरांत श्रीमंतांना मुबलक आणि हवी तेव्हां दारू मिळते. पण पोलिसांच्या हातीं सांपडतात ते गरीब कामगार आणि हप्ता द्यायला चुकलेले हातभट्टीवाले. एकूण चोरून दारू पिणें आणि गाळणें यांत मग्न असलेल्या लोकांपैकीं जेमतेम १० टक्के लोकच पोलिस पकडूं शकतात. आणि मुंबईत आठवड्याला सरासरीनें अडीच ते तीन हजार ईसमांना या कायद्याखालीं पकडतात. म्हणजे मुंबई शहरांत या व्यसनानें केवढें उग्र स्वरूप धारण केलें आहे याची कल्पना येते. पण दारूबंदी उठवूनहि आतां चालणार नाहीं. तर सरकारनें स्वतः लोकांना उत्तम आणि स्वस्त मद्य उपलब्ध करून दिलें तरच हा चोरटा धंदा थांबेल. पण तूर्त तरी यशवंतराव चव्हाण हें धाडस करण्याच्या मनःस्थितीत नाहींत आणि त्यामुळें तूर्त दारूबंदीचे ताप आणि प्रताप चालणारच.

## गतवर्षांतील शिक्षण

महाराष्ट्रांतील शिक्षणाची घोडदौड झपाट्यानें चालू आहे. महाड, वेंगुर्ले, ठाणें, श्रीरामपूर, मालवण, चोपडें, नांदेड आदि अनेक ठिकाणीं कॉलेजें चालू करण्याचे प्रयत्न सुरू झाले. मुंबईतच दोन मोठीं कॉलेजें सुरू झालीं. त्यामुळें आतां प्राध्यापक आणि मास्तर यांच्यांत गुण आणि संख्या या दोन्ही दृष्टीनीं भेदभाव राहिलेला नाहीं. महाराष्ट्र सरकारनें जिल्ह्या जिल्ह्यांत पॉलिटेकनीक्स काढण्याचा निर्णय घेतला असून आयुर्वेदाच्या शिक्षणाला आणि संशोधनाला प्राधान्य देण्याचें ठरविलें आहे. गेल्या वर्षी एस्. एस्. सी. बोर्डानें आपली परीक्षेची फी वाढवून जनतेंत असंतोष निर्माण केला. तत्पूर्वी माध्यमिक शाळांची फीवाढ आणि त्याची शिक्षणमंत्र्यांच्या आदेशानें स्थगिति असाहि विनोदी प्रकार घडला. महाराष्ट्र शिक्षणाच्या बाबतींत आघाडीवर आहे, पण सरकारी केंद्रीय परीक्षांत मराठी मुलें मागें पडतात. खडकवासल्याच्या लष्करी महाविद्यालयांत पांच टक्के सुद्धां मराठी मुलें नाहींत ही शोचनीय बाब. म. सरकारनें कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत लष्करी शिक्षण सुरू केलें आणि तें इतर कॉलेजांतहि सवडीनें लागू करण्याचा सरकारचा इरादा आहे.

विद्यार्थ्यांतील बेशिस्तीची एक समस्या देशांतील विचारवंतांपुढें आहे. त्यामानानें मराठी मुलें अजून तरी मार्गावर आहेत. असें म्हणावयास हरकत नाहीं.

आमच्या शिक्षणाची मदार ज्याच्यावर त्या प्राथमिक शिक्षकाच्या गान्हाण्याकडे सरकारचें अजून लक्ष जात नाहीं आणि म्हणून खेड्यापाड्यांतील शिक्षणाचा दर्जा फार खालावला आहे. अल्पवेतनावर खेड्यांत जाऊन शिकविण्यासाठीं लायक शिक्षक तयार नसतात हा अनुभव महाराष्ट्रांत आहेच. याशिवाय आदिवासी, मच्छीमार आदि जमातीच्या खास शिक्षणाच्या अशा कांहीं वेगळ्या समस्या आहेतच. गेलें वर्ष या दृष्टीनें फारसें प्रगतीचें नव्हतें.

## गतवर्षांतील महाराष्ट्राचें अर्थकारण

संयुक्त महाराष्ट्राची अर्थव्यवस्था खणखणीत आहे असा दिलासा महाराष्ट्राचें

अंदाजपत्रक सादर करतांना अर्थमंत्री शेषराव वानखेडे यांनी दिला होता. त्यांनी जें भाषण त्याप्रसंगीं केलें त्या भाषणावरून महाराष्ट्राच्या अर्थव्यवस्थेची नीट कल्पना येईल. अशा तऱ्हेची माहितीपूर्ण पुस्तिका अर्थखात्यानें प्रकाशित करावयास पाहिजे होती.

याशिवाय महाराष्ट्राच्या एकूण उद्योग-धंद्याचा विकास आणि महाराष्ट्रापुढील प्रश्न यांचा विचार करण्यासाठीं मुंबईत दोन परिसंवाद घडवून आणण्यांत आले. उत्सवी संमेलन आणि भोजनप्रिय लोकांचा मेळावा अशी सार्थ टीका या परिसंवादावर त्या काळांत झाली. त्यांतील एका परिसंवादा-मार्फत 'महाराष्ट्रापुढील प्रश्न' या नांवाचें एक चोपडेंहि प्रसिद्ध करण्यांत आलें. अशा परिसंवादाचा फारसा उपयोग होत नाहीं हें कांहीं नव्यानें सांगायला नको.

आतां यावर्षी महाराष्ट्राचे डोळे कोयने-कडे लागले आहेत. किंवा वारंवार उच्चार करून नेतेमंडळी शंकाकुल लोकांना निरुत्तर करूं लागले आहेत. पण कोयनेनें आबादी आबाद होईल हा प्रवाद खोटा आहे. आज महाराष्ट्राचा प्रश्न आहे कोरडवाहू शेतीचा आणि कोंकणांतील जमिनीना पाणीपुरवठा कसा करायचा याचा. सोलापूर आणि नगर जिल्ह्यांतील बंडिंगच्या कामामुळें हजारों एकर जमीन सुधारली खरी पण हें कार्य युद्धभूमिकेवरून व्हायला पाहिजे. कोंकण आणि मराठवाडा हे अजून उपेक्षित आहेत. त्यामुळें कोंकण डेव्हलपमेंट कौन्सिल आणि कोंकण रेल्वे यांची मागणी करा हा अन्नमंत्री श्री. स. का. पाटील यांनीं जो आदेश दिला तो अत्यंत सार्थ आहे. मात्र मनांत घेतलें तर पाटीलच या गोष्टी मिळवून देतील हेंहि सत्य आहे.

राष्ट्रीय बचत योजनेनें महाराष्ट्रांत मूळ धरलें आहे पण ही योजना खेड्यांतील सहकारी चळवळी प्रगतीच्या आड येतां कामां नये असा जो मुख्यमंत्री चव्हाण यांनीं योजनेच्या प्रवर्तकांना दिला दिला तो यथार्थ आहे.

महाराष्ट्राच्या अर्थकारणांत उद्योगधंद्यांना वाव आहे. आणि यासाठीं उद्योगधंदे हें खातें मुख्यमंत्र्यांनीं आपल्या हातीं घेतलें आहे. पण अजून हें खातें व्हावें तितकें कार्यक्षम झालेलें नाहीं. लोकांच्या अर्जाची दाद लागत नाहीं, उद्योगविषयक सरकारी सवलती काय आहेत याची माहिती लोकां-पर्यंत पोंचत नाहीं. यासाठीं खास संपर्का-धिकारी नेमला आहे अशी सरकार खोटीच जाहिरात करून लोकांची फसवणूक करतें. स्टेट फायनान्शियल कॉर्पोरेशनचा कारभार तर याहूनहि संतापजनक आहे. त्यांत एकेका प्रकरणाचा निकाल लागायला दोन दोन वर्षें लागतात. आमचे मंत्री दौरे आणि भाषणें करावयास फार सोकावले आहेत. ते ही चैन बंद करून खातीं कार्यक्षम कशी होतील याकडे लक्ष देतील तर महाराष्ट्राची प्रगति कांहीं दूर नाहीं.

**बँक ऑफ महाराष्ट्र**

'बँक ऑफ महाराष्ट्र'ला २५ वर्षे पूर्ण झालीं याबद्दल तिचें व तिच्या कार्यक्षम चालकवर्गाचें अभिनंदन. महाराष्ट्रांत या बँकेने आवाडीवर राहून मोठेंच कार्य केलें आहे. मध्यमवर्गातील व्यक्तींना व्यापार उदीमांच्या क्षेत्रांत पुढें येण्यास सहाय्य केलें आहे. बँकेची उत्तरोत्तर प्रगति होवो हीच या शुभ प्रसंगीं दीपावलीची सदिच्छा.

**पिनाकी**

• • •

( पान १० वरून चालू )

त्यांचे लेख प्रसिद्ध केले. 'शंभर नंबरी सोनें' या शब्दांत त्यांनीं देऊसकरांच्या साहित्यगुणांची प्रशंसा केली होती. यावरून परिश्रमानें केवढें प्रभुत्व त्यांनीं संपादन केलें होतें याची कल्पना येईल.

**'हितवादी'शीं संबंध**

या सुमारास कलकत्त्यांत 'हितवादी' पत्राचा बराच बोलबाला झाला होता. १८९१ सालीं तें साप्ताहिक म्हणून प्रथम अवतीर्ण झालें. सुरेंद्र-नाथ बानर्जी, भूपेंद्रनाथ बसु यांसारखी मंडळी त्याच्या संस्थापकांत होती. 'हितं मनोहारि च वचं सुदुर्लभः' हें त्या पत्राचे ब्रीदवाक्य होतें. सुरेंद्रनाथ बानर्जींच्या आग्रहावरून 'विचारक' व 'त्रैमासिक समालोचक' या पत्रांचे संपादक व रिपन कॉलेजचे प्राचार्य श्री. कृष्णकमल भट्टाचार्य त्याचे संपादक झाले. साहित्यविभागाची धुरा रवींद्रनाथ ठाकुरांनीं उचलली. ते दर आठवड्यास लिहूं लागले. रवींद्रांच्या लघुकथा प्रथम याच साप्ताहिकांत प्रसिद्ध झाल्या. बंकिम-चंद्र चतर्जी, रमेशचंद्र दत्त यासारखी अग्रगण्य साहित्यिक मंडळी त्यांत लिहीत असत. पुढे मतभेद निर्माण झाले. कृष्णकमलबाबूंनीं त्यागपत्र दिलें. रवींद्रांनीं पण आपले संबंध कमी केले. यानंतर श्री. कालिप्रसन्न काव्यविशारद हे 'हितवादी'चे संपादक झाले. यांच्याच कारकीर्दीत योगींद्रनाथ बसूंच्या प्रोत्साहनानें देऊसकर 'हितवादी' पत्रांत नियमानें लेख पाठवूं लागले. त्यावेळीं देवघर येथें मि. हार्ड म्हणून मॅजिस्ट्रेट होता. 'हितवादी' मध्यें त्याच्या आचारभ्रष्टते-विषयीं कांहीं परखड लिखाण आलें. वस्तुतः 'हितवादी' पत्र नरम गटाचें होतें. तरीही सत्ताधाऱ्यांच्या अनाचारावर शस्त्र धरण्यास तें कचरत नसे. मि. हार्ड हा देवघरच्या शाळेच्या संचालक समिती-चाही प्रमुख होता. हितवादी पत्राशीं संबंध ठेवल्यामुळें रोष होऊन त्यानें देऊसकर आणि योगींद्रनाथ बसु या दोघांनाही नोकरींतून कमी केलें. नांवाप्रमाणेंच कठिण काळजाच्या या गोऱ्या अंमल-दारानें त्यांचा पिच्छा पुरविला व गांवांत राहणेंच कठिण केलें. १८९७ मध्यें त्यांना सहकुटुंब स्थलांतर करणें भाग पडलें. नियतीच्या अतर्क्य फेऱ्यांत सापडलेल्या देऊसकरांना शिक्षकाचा शांत-स्निग्ध पेशा सोडावा लागला. विराट कलकत्ता नगरींतील सर्वग्रासी वृत्त-पत्रसृष्टीनें त्यांना आसरा दिला. एका दृष्टीनें हें स्थलांतर शाप न म्हणतां वरदानच म्हटलें पाहिजे. कारण त्यामुळें देवघरसारख्या आडगांवांत कुचंबणारी त्यांची प्रतिभा अनेक अंगांनीं विक-सित झाली.

'हितवादी'तील लिखाणामुळेंच देऊसकरांवर आपत्ति आली याची विशारदमहाशयांना जाणीव होती. त्यांनींच या असहाय अवस्थेंत मदतीचा हात पुढें केला. मासिक ३० रु. तनख्वाह त्यांनीं देऊसकरांना मुद्रित शोधक म्हणून लावून घेतलें. देऊसकरांच्या अंग-भूत गुणांचे पैलू चमकण्यास फारसा अवधि लागला नाहीं. त्यांच्या गुणसंपदेवर लुब्ध होऊन त्यांना अधिक जबाबदारीची कामगिरी मिळत गेली. वेतनांतही वाढ होत गेली. कालिप्रसन्नांचें उजवे हात

म्हणून त्यांचा नांवलौकिक झाला. हेमेंद्रप्रसाद घोष यांनीं आपल्या आठवणींत लिहिलें आहे, "असाधारण श्रमशीलता ओ विस्मयकर एकाग्रतार फले तिनि क्षमताशाली संपादक भाषार विशुद्धिरक्षा-तत्पर विशारदेर जीवनेर शेष समय ताँहार प्रधान अवलंबन छिलेन।" (अपार परिश्रम आणि आश्चर्यकारक एकाग्रता यांच्या बळावर कालिप्रसन्नांसारख्या चोखंदळ व समर्थ संपादकाच्या विश्वासाचे ते निधान ठरले.) हितवादींचें इंग्रजी भावंड 'दी बेंगाली.' दोन्ही पत्रें तत्कालिन राजकारणाच्या भाषेंत 'नरम' पक्षाची होती. देऊसकरांवर गरम गटाचे संस्कार झालेले. परंतु सरावानें स्वतःच्या विचारांशीं सदैव प्रामाणिक राहून लिहितां येईल तेवढें त्यांनीं लिहिलें. अनेक वेळां तसें तोलून मोजून लिहिण्या-विषयीं त्यांना अरुचि वाटे. त्यांचा पिंड ज्वलंत राष्ट्रीय बाण्याचा, तर कालिप्रसन्न प्रभृति मंडळी जहाल गटाचा पदोपदीं पाणउतारा करीत. बारिसालच्या प्रांतिक परिषदेंत पोलिसांच्या बडगाशाहीची परिसीमा झाली. जहाल-मवाळ न म्हणतां सर्वांवर सारखेच अत्याचार झाले. सुरेंद्रनाथ बानर्जींनीं आपल्या आत्मकथेंत लिहिल्याप्रमाणें बारिसालची परिषद उधळली गेली. त्या दिवशीं हिंदुस्थानांत जहाल राष्ट्रीय पक्षाचा जन्म झाला. एवढा प्रक्षोभ त्यावेळीं निर्माण झाला होता. पण काव्यविशारदांनीं आपलें पालुपद सोडलें नाहीं! या परिषदेवर त्यांनीं 'आत्मशक्तिर परिणाम' या शीर्षकाचें एक व्यंगचित्र प्रसिद्ध केलें. त्यांत ब्रह्मबांधव उपाध्याय, बिपिनचंद्र पाल ही मंडळी पोलिस पहातांच पळतांना दाखविली होती. 'कालिप्रसन्न समय तमय कार्यसिद्धिर उत्साहे विचार–निवेचना हाराइतेन।' हा समकालिन शेरा त्यांच्या स्वभावाचा निदर्शक आहे. याच सुमारास हितवादींत प्रसिद्ध झालेल्या 'रुचिविकार' नामक कवितेनें आपली बदनामी झाली आहे असा दावा प्रिन्सिपॉल हेरंबचंद्र मैत्रांसारख्या प्रतिष्ठित विद्वानानें गुदरला. कालिप्रसन्नास त्यांत हार खावी लागली व त्यांची जराजर्जर प्रकृति ढांसळली. प्रकृतिस्वास्थ्यासाठीं ते जपानला निघाले. निघताना आपल्या विश्वासू सहकाऱ्यावर-देऊसकरांवर त्यांनीं संपादनाचा भार निर्धास्तपणें सोंपविला. जपान-हून परत येत असतांना (१९०७ सालीं) विशारदमहाशयांनीं समुद्रवक्षावरच राम म्हटला. चालकवर्गानें नवीन संपादकासाठीं शोध न करतां देऊसकरांचीच ९० रु. दरमहा पगारावर नेमणूक करून त्यांच्या कर्तबगारीवर शिक्कामोर्तब केलें.

## सुरत येथील 'दक्षयज्ञ' आणि देऊसकरांची आत्माहुति

या अवधींत त्यांचे कांहीं ग्रंथही प्रसिद्ध झाले होते. त्याविषयीं सविस्तर विवेचन पुढें येणारच आहे. मातृभाषा मराठी असलेल्या एका गृहस्थांनीं हितवादीसारख्या वजनदार वृत्तपत्राच्या संपादकीय आसनावर विराजमान व्हावें ही घटना सामान्य नव्हती. तत्कालीन बंगाली समाजाच्या गुणग्राहकतेची पण ती निदर्शक होती. आणि हा अपूर्व मान त्यांनीं आपली पात्रता सिद्ध करूनच मिळविला होता. त्यांच्यावरील मृत्युलेखांत सुरेंद्रनाथांच्या 'बंगाली'नें म्हटलें होतें, "For one to whom Bengali was not the mother-tongue to have been appointed first as Assistant Editor, then as Editor of one of the most popular weeklies conducted in that language was no ordinary honour, and this signal honour was done to him by the proprietors of '**Hitabidi**' not as a matter of favour, lent because he fully deserved it."

'कॉंग्रेस' या पुस्तकांत श्री. घोष यांनीही असाच निर्वाळा दिला आहे, "तिनि किरूप दक्षतार सहित एइ कार्ये संपन्न करियाछिलेन —दलादलीर वात्याय–राजनैतिक आंदोलनेर तरंग ताडने तिनि किरूप निपुणतासहकारे 'हितवादी' परिचालित करियाछिलेन, ताहा काहारओ अविदित नाई।" (राजकीय गटबाजीच्या वादळां-तून त्यांनीं 'हितवादी'चे तारू केवढ्या कौशल्यानें हांकलें व, किती दक्षतेनें आपलें संपादकीय कर्तव्य बजाविलें हें सर्वश्रुतच आहे.)

संपादक झाल्यानंतर अवघ्या ४–५ महिन्यांतच सुरत येथील राष्ट्रसभेचें तें ऐतिहासिक अधिवेशन झालें. त्यास दक्षयज्ञाची उपमा देण्यांत येते. त्या अधिवेशनास हितवादींचा संचालक गट उपस्थित होता. या संचालकांनीं संपादकांना तार ठोकली 'हित-वादी'चें इंग्रज भावंड 'बंगाली' पत्रानें एक खास सायंसंस्करण प्रसिद्ध केलें. त्यांत अध्यक्षीय भाषण छापलें व उधळलेल्या अधिवेशनाची बातमी देण्याऐवजीं तें सुरळित पार पडल्याचा कल्पित वृत्तांत छापला. उत्साहाच्या भरांत या पत्राकडून पूर्वीहि असा प्रकार झाला होता. एकदां महाराणी व्हिक्टोरियाची मृत्युवार्ता छापून मागाहून माफी मागण्याचा प्रसंग ओढवला होता! देऊसकर या प्रकारानें अन्यमनस्क झाले. त्या दिवशीं 'वंदे मातरम्' कचेरींत जाऊन त्यांनीं अधिवेशन उधळल्याची वार्ता तेथील मंडळींना कळविली. 'वंदे मातरम्' म्हणजे निर्भय, क्रांतिप्रवण मंडळींचें केंद्रस्थानच होते. देऊसकरांचे व या सर्वांचे संबंध फारच जिव्हा-ळ्याचे होते. देऊसकरांना जेव्हां टिळकांविरुद्ध लिहिण्याचा फतवा तारेनें आला तेव्हां त्यांच्या संयमाचा बांध कोसळला. त्यांचा स्वाभिमान, त्यांचा मराठी बाणा उफाळून वरती आला. पूर्वी शिवाजी उत्सवाच्या बाबतींत किंवा क्रांतिकारकांशीं असणाऱ्या संबंधांच्या बाबतींत मिळालेला इशारा त्यांनीं ऐकून घेतला होता. परंतु देशासाठीं तळहातावर शिर घेऊन लढा देणाऱ्या गुरुवर्य टिळकांविरुद्ध लेखणी उचलण्याचा विचारहि त्या तेजस्वी पुरुषास सहन झाला नाहीं. भिक्षान्न खाणें परवडले पण नीच गुरुद्रोह कदापि करावयाचा नाहीं हा निश्चय क्षणार्धांत घेतला. स्वतःचें दारिद्र्य, कुटुंबाच्या भरणपोषणाचें दायित्व, मानमरातब सान्यांवर त्यांनीं उदक सोडलें. टिळकांच्या निंदापुराणांत सहभागी होण्याचें नाकारून त्यांनीं त्याच दिवशीं संपादकत्वाचें त्यागपत्र दिलें. दरिद्री व्यक्तीस दुर्घट असा हा त्यांचा निर्णय कित्येकांस विस्मयावह वाटला. पण त्यांच्या अव्यभिचारी निष्ठेचा तो निदर्शक होता. अशा रीतीनें त्यांचा हितवादीशीं जडलेला संबंध तात्पुरता संपुष्टांत आला. (क्रमशः)

(संदर्भसाहित्याचे उल्लेख लेखमालेच्या शेवटीं देण्यांत येतील)

अनुक्रमणिका








## सी. के. नायडूंनीं केलेला प्रश्न

# आतां कलकत्याला काय करणार ?

कानपूरचा दुसरा कसोटी सामना संपतांच रेडिओ-निवेदकांनीं उभय कप्तानांस बोलावून घेतलें. आणि सामन्या-विषयीं थोडी बातचीत केली. हाहि सामना अर्धवट राहिला, पुन्हां एकदां प्रेक्षकांची निराशा झाली, पण खेळ मोठा अटीतटीचा झाला, असल्या औपचारिक मोघम गोष्टी तुम्ही–बरे–आम्ही–बरेच्या संभावित सुरांत झाल्या. शेवटीं कर्नल सी. के. नायडूंनीं त्यांना प्रश्न केला, 'आतां कलकत्याला काय करणार ?' उत्तर काय मिळालें तें नीटसें कळलेंच नाहीं. कदाचित् कप्तान-द्वयानें तें हंसण्यावारी घालवलें असेल. कदाचित् त्यांनीं कांहीं म्हटलेंहि असेल; पण भोंवताल्च्या कोलाहल (ज्यांत पिपाण्या सामील होत्या), रेडिओची घरघर आणि 'विझी'च्या मेसूर आवाजीमुळें कानाला (आणि रेडिओलाहि ?) बसलेले दट्टे यामुळें कांहीं ऐकूं आलें नाहीं खरें ! शेवटीं मनांत उरला फक्त 'सी. के.'चा प्रश्न ! प्रश्न लाख जिभांवर असलेला–वैतागलेल्या जिभांवर त्याला विशेष धार आली ती इतिहास-जमा झालेल्या सी. के.च्या वीर-कथांच्या रोमांचकारक आठवणींनी अस्मानी कलावंतानें खुरटणाऱ्या आणि खर्डेघाशी कारागिराला कुशल विचारल्यासारखें सुरांच्या बादशहानें साथीदारांच्या (आणि स्टॉप्-वॉच्च्या) इशाऱ्याबरहुकूम चोरट्या आवाजांत गाणाऱ्या धंदेवाईकाची विचारपूस केल्यासारखें......

पाकिस्तानी संघ येऊ घातला तेव्हांपासूनच नगारे वाजत होते ते त्याच्या तुफानी चेंडूफेकीचे —आणि हनीफ महम्मदच्या अचाट बॅटिंगचे. फाझल महमूदनें इंग्लंड, ऑस्ट्रेलिया आणि वेस्ट इंडीज्सारख्या खंद्या दुष्मनांची कशी त्रेधा तिरपीट उडवली, बोलिंगच्या त्या जातींत "त्यासम तो" कसा, याची रसभरीत वर्णनें प्रसिद्ध होऊं लागली. आठ वर्षांपूर्वी लखनौच्या कसोटी सामन्यांत हिंदुस्थानला त्याचा तडाखा कसा भोंवला त्या आठवणीचीहि खपली निघाली. त्याची साथ करायला पुन्हा आणखी दोन, तीन द्रुत–गतीचे खवीस त्यांत हिंदी बॅटिंगची असल्या चेंडूफेकीला तोंड देण्याबाबत केव्हांच लाज उघडी पडलेली ! आराम–खुर्चींत क्रिकेट 'वाचणारे' आणि शिळोप्याला क्रिकेट 'बोलणारे' अशांच्याहि पोटांत गोळा उठला. आणखी वर हनीफ महम्मदच्या जागतिक विक्रमाचा आंकडेबाज दरारा ! त्यानें म्हणे वेस्टइंडीज्मध्यें एकदां साडेसोळा तास खेळून ३३७ धांवा जमवल्या !

अशी गर्जत आणि 'शंख फुंकीत' उत्तरेकडून स्वारी आली. त्यांत हॉकींतील हिंदुस्थानचें अजिंक्यपद पाकिस्ताननें नुकतेंच हिरावून घेतलेलं; बत्तीस वर्षांचा दिग्विजयी नक्षा उतरल्याचा मान-भंग अजून ताजा आणि बाह्याता होता. त्याचा बदला घ्यायची चिरड होती. उलट, हॉकीप्रमाणें क्रिकेटमध्येंहि खात्मा करू असा आक्रमक पाकिस्तानी दर्प गुरगुरत होता. म्हणून या सामन्यांना निराळाच रंग भरणार, सर्वस्व पणाला लावल्यासारखी जिद्द पेटणार–अगदीं "ऑल्-इन्" क्रिकेट होणार—याची ज्याला त्याला खात्री. उत्साह शिगेपर्यंत भडकला. तिकीट-विक्रीचे विक्रम झाले. मुंबईच्या अवाढव्य ब्रेबर्न स्टेडिअममधील जागा दोन दिवसांत 'उडाल्या;' रांगेंत उशिरा आले ते हळहळले. तिकिटें खपलीं तीं पुऱ्या सामन्याची—पांच दिवसांची. दिवसाची तिकिटें विकायलाच निघालीं नाहींत. हजारों शोकीन तिकिटासाठीं वणवण हिंडू लागले. मग वशिला, लाचारी, काळाबाजार—जमेल आणि झेंपेल त्याची कास धरूं लागले. वावड्या उठल्या कीं या खेळांतील तेढीच्या निमित्तानें जुनी धार्मिक तेढ चिघळणार, कोणी चिघळवणार. कडक पोलीसी बंदोबस्ताच्या बातम्या पसरल्या. एकूण निर्ढावलेल्या मुंबईकरांनीहि "असा ऐसा जाहला नाहीं" हें अचंब्यानें म्हणावें असा क्रिकेट-ज्वर चढला.

उत्साहाला उधाण येण्याला आणखी एक कारण: गेलीं कांहीं वर्षें कसोटी-सामन्यांसाठीं

**मं. वि. दे जा ध्य क्ष**








अखेर 'शंभरी' गांठली !

जी निवड-समिती होती तिच्या कारवाच्या आणि तिच्यांतील लाथाळ्या यांची खरकटीं चवाठ्यावर मधूनमधून निघत होती; लोकांना त्यांची उबग येत होती. या समितीचा अध्यक्ष, सूत्रधार, कर्ताकरविता—सबकुछ लाला अमरनाथ. लालाजींची खेळाइतकीच दंडेलीबद्दलहि प्रसिद्धि. यंदा काय चमत्कार घडला कुणास ठाऊक, लालाजींचें आसन अकस्मात् ढळलें. सुलतान पदच्युत झाला आणि अल्लाघरची गाय अशी ज्याची सार्थ तारीफ, तो विजय हजारे अध्यक्षपदीं आरूढ झाला. कालपरवापर्यंतचा त्याचा बडोद्याचा सहकारी हेमू अधिकारी समितींत आला. बंगालचा दत्ता रे राहिला. अमरनाथाचा तो होयबा; म्हणून अमरनाथ गेल्यावर त्याचीहि सद्दी संपली. चौथा मद्रासचा गोपालन्. एकूण, समितीच्या कारभारांतली अरेरावी जाऊन तिचे निर्णय निःपक्षपाती आणि समंजस होतील असा भरवसा वाटूं लागला. शकून बरा झाला...

आणि नरी कॉंट्रॅक्टरसारख्या नव्या दमाच्या खेळाडूला समितीनें कप्तान म्हणून निवडलें तेव्हां तिच्यावरील विश्वास आणखी बळावला. त्या उमेदींत असेंहि वाटलें कीं अशीच आणखी साफसुफी होऊन अनेक होतकरू खेळाडूंना कसोटी सामन्यांत प्रवेश मिळेल; जुन्या झाळाळीवर जागा अडवून बसलेल्यांना हुसकून लावलें जाईल. डझनभर नव्यांना चांचणीसाठीं बोलावल्याचें वृत्त वाचून ती उमेद आणखी सुखावली.

पण समितीनें त्या उमेदीचा आरंभींच मुखभंग केला. पहिल्या सामन्याच्या यादींत फक्त एकुलतें एक नांव नवें निघालें—रूसी सुर्तीचें. ठरलेले तेच मिरासदार. नव्या रक्ता-ऐवजीं तेंच थकलेलें थंड रक्त. गेल्यावर्षीच्या इंग्लंडच्या दौऱ्यांतील कांही बेशिस्तीबाबत चौघा खेळाडूंची आयत्यावेळीं—आणि दौरा संपून वर्ष लोटल्यावर-चौकशी झाली. चौघेहि सुटले. त्यापैकीं थोडीफार सारवासारव होऊन तिघांना संघांत घेतलेंहि. नव्यांना खेळविण्याची हिम्मत दाखविली नाहीं; अति-सावधपणा ? कीं पाकिस्तानच्या पराक्रमाचा दरारा ?

त्यापैकीं मुख्य दरारा बोलिंगचा; तो पोकळ ठरला. फाझल महमूच्या झपाट्याला पेन्शनीची कला आल्याचें उघड झालें. त्यानें फारशी बोलिंग केलीच नाहीं; आणि सामन्याच्या उत्तरार्धांत तर तो गैरहजर राहिला. महमूद हुसेननें दमदारपणें तासतासभर वेग टिकविला; पण काळीज कलकलावें असें त्यांत कांहीं नव्हतें. धिम्या चेंडूच्या चलाखीला तर मुंबईला विशेष वाव नसतोच.

पहिल्या सलामीलाच लौकिक राखला—आणि वाढवला तो हनीफनें. आरंभीच नाना जोशीनें त्याचा झेल सोडला खरा; पण तें गालबोट. (हनीफला जोशीला नव्हे !) तो सफाईचा, धडाडीचा आणि तयारीचा खेळ पाहून डोळे निवले. सईद अहमद सोडल्यास उरलेल्यांची ससेहोलपट झाली. साडेतीनशांचा पाकिस्तानी ऐवज. त्यापैकीं तीनशें त्या दोघांनी जमविलेला !

फाझल बोथट झाला आहे हें ध्यानांत आल्यावर वाटलें आतां हिंदी बॅटिंगला रान मोकळें झालें. साडेतीनशे म्हणजे किस झाडकी पत्ती ! पण एखादा दुसरा अपवाद सोडल्यास आमच्या गाजलेल्या अतिरथी-महारथींच्या डरपोक वृत्तीला कसल्या अनामिक भीतीनें ग्रासलें कोण जाणे ! मांजरेकरसारखा एका काळच्या रगेल खेळाडूच्या निष्कारण नाड्या आंखडल्या. उमरीगरची एकाकाळीं तळपणारी बॅट कशालाहि बिचकू लागली. कप्तानपदाच्या ओझ्याखाली कॉन्ट्रॅक्टरच्या खेळाला पोंक आले. बोर्डे-नाडकर्ण्यांनी थोडाफार जिवंतपणा दाखवला. पण इतकें फाजील हिशेबी खेळूनहि साडेतीनशेचाहि पल्ला गांठतां येत नाही अशी नामुष्कीची वेळ आली. त्यांतून वाचविलें तें दहाव्या जागीं खेळायला आलेल्या बोलरनें. रमाकांत देसाईनें स्टेडिअम जिकला; जोशीच्या (लटपत्या) मदतीनें साडेचारशें पर्यंत मजल मारली. त्यानें अब्रू घेतली ती वैऱ्यांची नव्हे, स्वकीयांची. आपल्या मोठमोठ्या पण भेदरट आणि केविलवाण्या खेळाडूंची !



अतिरथींना 'धडा' शिकवला

पहिला डाव संपायलाच पाचव्या दिवसाचा तासभर जावा लागला. सामन्याचा मुडदा पाडला गेला. हिंदुस्थानचें कुशल फिरकीचे बोलिंग लक्षांत घेतां, आणखी थोडा वेळ

मुंबईपासून........



मिळता तर त्याला यशाची केवढी संधि होती ! पण आमच्या पूर्वार्धांतील बॅटिंगच्या नेभळेपणानें ती गेली.

कानपूरला तेंच. पाकिस्ताननें बचावाचा खेळ खेळावा हें या परिस्थितींत प्राप्तच होतें. पण त्यांनी पहिल्या दिवशीं १७० धावा केल्या तर हिंदुस्थाननें तिसऱ्या दिवशीं धड दीडशेंहि केल्या नाहींत. जयसिंहाला सहा कीं सात तास कुंथून शतक लाभलें नाहीं. त्या मानानें उमरीगरनें मोठी बहाद्दुरी दाखवून पांच-सहांच तासांत शतक जमविलें ! हनीफ दोन्हीं डावांत थोडक्यांत उडाला; पण त्यामुळें कांहीं हिंदी बॅटिंगची ईर्ष्या चढली नाहीं. तोच तोच मरगळलेला, बेहिमती खेळ; चेंडू स्टंपपासून दूर ठेवणें ही इतिकर्तव्यता मानण्याचा, चामडी (आपल्यापेक्षांहि चेंडू) बचावण्याचा, मठ्ठ प्रकार......

मुंबईच्या सामन्यांत कांहीं काळ पाकिस्ताननें 'न-कर्ती' बोलिंग केली याबाबत फार ओरड झाली; तिच्यांत थोडें तथ्य आहे. पण हिंदुस्थानच्या न-कर्त्या बॅटिंगचा गुन्हा त्याहून दसपट घोर. चढाईच्या वेळीं पुढयाला पाय लावण्याचा कमअस्सलपणा होता तो—म्हणजे आपल्याच पुढयाला आपलेच पाय...

पराभव चुकवला यांत प्रतिष्ठा मानायची; सामना अनिर्णित ठेवला हा पराक्रम समजायचा; आणि पहिल्या डावांत प्रतिपक्षाहून अधिक धांवा केल्या म्हणून टिऱ्या बडवायचा—असला वांझ खेळ आपल्या बोकांडीं बसला आहे. आवाक्यांत असलेला विजय ज्या खेळाडूंच्या दुबळेपणामुळें हातचा जातो, ते सामना हरणाऱ्या खेळाडूंपेक्षां शतपटीनें अपराधी. सरळ सामना हरण्यांत मर्दपणा असतो. फक्त हार चुकविण्यासाठीं खेळण्यांत पंढपणा असतो.

विजयाच्या हिरीरीनें खेळणाऱ्या—आणि कित्येकदां निकालाची तमा न बाळगतां खेळाच्या मस्तींत रंगणाऱ्या सी. के. नायडूंनीं तो प्रश्न विचारावा हें योग्यच. त्याचें उत्तर कोण देणार ? • •

## सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा अपूर्व सामना



नुकताच ऑस्ट्रेलिया विरुद्ध वेस्ट इंडिज हा ब्रिस्बेन येथें झालेला पहिला कसोटी सामना क्रिकेटच्या आयुष्यांत एक महान् आश्चर्य निर्माण करून ठेवून संपलेला सामना होय ! कसोटी सामन्यांच्या इतिहासांत आजतागायत अशी संस्मरणीय घटना घडलेली नाहीं.

दोन तुल्यबल संघांचा हा संग्राम ज्या महाभागांनीं पाहिला असेल ते मोठे दैववान म्हटलें पाहिजेत. विजयमाला हस्तगत करण्यासाठीं हा सामना दोन्ही संघांनीं इतक्या शर्थीनें लढविला कीं अगदीं अखेरच्या क्षणापर्यंत खुद्द ब्रिस्बेनच्या स्टेडियममधील प्रेक्षकांचे आणि रेडियोंतलें समालोचन ऐकणाऱ्या श्रोत्यांचे प्राण अक्षरशः कंठाशीं आले होते, असें म्हटलें तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

प्रतिस्पर्धी संघाला जिंकण्यासाठीं फक्त एकाच धांवेची गरज होती. फक्त एकच धांव, कीं जिच्यासाठीं आस्ट्रेलियन संघांतल्या खेळाडूंनीं जिवाचें रान केलें. तिघां खेळाडूंनीं तर या एका धांवेसाठीं आत्महत्या करून घेतली. अखेर ऑस्ट्रेलियाला ती धांव मिळालीच नाहीं व अशा रीतीनें हा सामना दोन्ही संघाची धांवसंख्या समान पातळीवर येऊन संपला. क्रिकेटच्या इतिहासांत अकल्पनीय अशा पुष्कळ घटना घडलेल्या आहेत; परंतु दोन्हीं संघांची धांवसंख्या सगळे गडी बाद होऊन एकाच सारखी (कसोटी सामन्यांत तरी) कधीं झालेली नाहीं.

अत्यंत कसोशीने खेळल्या गेलेल्या या सामन्याचा निकाल कुण्या एका बाजूना झाला असता तर मात्र अनेक क्रिकेट तज्ञांना व शौकिनांना वाईट वाटलें असतें. कदाचित् तें अन्यायाचेंहि ठरलें असतें. हा सामना उभयपक्षीं बरोबरीचा संपला हें ठीकच झालें

(पान ५८ वर-पहा)



........कलकत्त्याकडे !

# ओसाड फलंदाजी आणि ढगाळ गोलंदाजीनें पछाडलेले



# भारत-पाक संघ



रखरखीत आणि कोरडा सामना या दोनच शब्दांत मुंबई व कानपूरच्या दोन टेस्टस्‌चं यथार्थ वर्णन करतां येईल. वेळेशी व्यस्त सख्य दाखवणाऱ्या धावा, निर्धाव षटकांचं आधिक्य, आणि पंख तुटलेली फलंदाजी हीच या दोन सामन्यांची वैशिष्ट्यं. गार वाऱ्याची झुळुक या सामन्यात अगदी क्वचित् वेळाच आली. मुंबईच्या हवेनं यंदा प्रेक्षकांना घाम आणला नाहीं पण कांहींच्या ओसाड फलंदाजीनं मात्र त्यांना अक्षरशः घाम आणला ! कानपूरच्या थंड हवेंत तर सकाळपासूनच उष्ण फलंदाजीचे कडक वारे वाहू लागायचे आणि त्यामुळें प्रेक्षक अगदी मेटाकुटीला येऊन जायचे ! गोलंदाजाने टाकलेले षटक् हे मारण्यासाठीं तसलेच, केवळ तरण्यासाठींच असते ही षटकाची नवीन व्याख्या यावेळी समजली ! भारतीय फलंदाजी तीन यष्टींच्या समोर इतकी अवघडून का बसली, तिने बैठा संप का पुकारला याचे बऱ्याच जणांना आश्चर्य वाटत आहे ! मुंबईच्या टेस्टमध्ये थोडीतरी खळबळ उडाली पण कानपूरच्या टेस्टमध्ये तीही नाहीं. मुंबईची टेस्ट तशी एरवी कंटाळवाणीच झालेली. कानपूरनं मात्र त्याच्यावर ताण केली ! निकालही नाहीं आणि प्रेक्षणीयताही नाहीं; यामुळं या दोन्ही टेस्टस् अगदीं कोरड्या आणि रखरखीत वाटल्या !

वस्तुतः यंदा भारतीय जनतेच्या उत्साहाची चढती कमीन उच्च बिंदूला पोंचली होती. गतवर्षी कानपूरच्या विजयानें रसिकांना भारतीय क्रिकेटबद्दल खूपच कांहीं वाटूं लागले होते. आशा अपेक्षा निर्माण झाल्या होत्या. तशांत यंदाचा पाकसंघ जितका कागदावर भारी वाटत होता तितका मैदानावर भारी वाटत नव्हता. भारतीय संघाची निवड पाहाता आमची फलंदाजी कांकणभर सरसच होती. गोलंदाजींत वैचित्र्यामुळें आमची बाजू प्रतिपक्षापेक्षां जरा बळकटच दिसत होती. आणि आजवरच्या टेस्टपूर्व सामन्यांत घडलेही होते तसें. पुण्याला तरण्या महाविद्यालयीन खेळाडूंनी पाक गोलंदाजीच्या मर्यादा उघड्या केल्या होत्या व धडाडी दाखवल्यास पाकच्या चेंडूत तितकी ताकद नाहीं हेंच दर्शवून दिले होते. बडोद्याला व अहमदाबादला आमच्या फलंदाजांनी पाक फलंदाजांवर वरचष्मा गाजवला होता व आपली धांवसंख्या त्यांचे पुढे रेटून नेली होती. दोन्ही संघ पूर्वीच्या टेस्ट सामन्यांतून अतिशय कंटाळवाणेपणानें खेळलेले आहेत हा दाखला इतिहास जरी पुढे करीत होता तरी दोन्ही संघांत जी पूर्वकालीन चुरस आहे त्यामुळें सामने निकरानें लढले जाऊन रंगतील असे कांहींना वाटत होते. मुंबईची चवथ्या दिवसाचा खेळ सोडला तर सामने कधी रंगलेच नाहींत आणि धांवांचा चोथा इतक्या संथपणे ते रवंथ करीत राहिले कीं त्यामुळें असंख्य प्रेक्षकांची निराशा झाली. कानपूरच्या मॅचने तर हजारोंच्या उत्साहावर विरजण पडलें. भारतीय संघ पाकपेक्षां भारी असूनही त्यांनी निर्णायक यशासाठीं कधीही प्रयत्न केला नाही. अपेक्षेप्रमाणें पहिल्या डावावर आम्ही पुढाकार मिळवूं शकलो हे खरे पण तेवढेंच. या लक्ष्मणरेषेच्या पलीकडे आम्ही जाऊच शकलो नाही, आणि हा पुढावा प्रस्थापित करतांना आमच्या फलंदाजीनें किती नखरे केले, किती वळसे घेतले, किती गजगतीचे नमुने दाखवले आणि किती धापा टाकीट, हळुहळु पावलं उचलीत मजल मारली ! या फाजील सावधगिरीनें आम्ही पाकपेक्षां दोन्हीवेळा पहिल्या डावातील धावसंख्येपेक्षा अधिक धावा जरी करू शकलो तरी धडाकेबंद पद्धतीने त्या केल्या असत्या आणि त्यामुळें पाकला दुसऱ्या डावामध्यें कोपऱ्यात खेचता आले असते, तसे आपणास काहींच करता आले नाही व त्यापासून निर्माण होणारा मानसिक दबदबाही आपणाला प्रतिपक्षाचे

**बाळ ज. पंडीत**












अनुक्रमणिका

मनांत उत्पन्न करता आला नाहीं. पुण्याला कॉलेज विद्यार्थ्यांनी दाखवलेली धडाडी व शिकवलेला धडा आपण विसरलो ! आणि आमचे मुरलेले, अनुभवी खेळाडू टेस्टमध्ये काही बाबतीत त्यांचेपेक्षाही कमी भरले ! अचूक गोलंदाजीचा मारा केला आणि क्षेत्ररक्षकांचे कडे केले कीं भारतीय अंगावर सरसावून येत नाहीं, छातीवर हातांची घडी घालून ती भिंतीला टेकून उभी राहाते हे आतां पाक कर्णधाराला पुरेपूर कळून चुकले आहे त्यामुळें आतां तो पुढच्या टेस्टमध्यें त्याचाच अवलंब करणार. अशा वेळेला आपण जास्त आक्रमक धोरण ठेवून व निर्भय, वेडर वृत्ती दाखवून जलद धांवा मिळवल्या आणि गोलंदाजी-क्षेत्ररक्षणांतहि चढाईचे डावपेच आंखले तरच विजयाची आशा. नाहींतर इतरहि टेस्टस् 'ड्रॉ' होण्याची शक्यताच अधिक !

आपल्याकडे पूर्वी अमरनाथ–मुस्ताक–रामचंद–सी. के. नायडू यासारखे आकर्षक शैलीचे, आक्रमक खेळाचे फलंदाज झाले आहेत. आज मात्र ती परंपरा खंडीत होऊं पहाते आहे. निस्सार, अमरसिंग, बॅनर्जीची झंझावाती गोलंदाजीची परंपरा बंद झालेलीच आहे. त्यांत आतां ही नवी भर नको. शिवाय आमच्याकडे पूर्वी सी. के., अमरनाथसारखे चढाईच्या धोरणाचे कप्तान होते, त्यांनीं विशेष कमावले नसले तरी गमावले नाहीं. पण आतां मात्र हजारेच्या परंपरेंतील बचावात्मक थाटाच्या नेतृत्वाचीच पैदास आमच्याकडे जास्तीत जास्त प्रमाणांत होऊं लागली आहे. हजारे व अमरनाथ यांच्या सीमारेषेवरचा अधिकारी सध्यां निवडसमितींत आहे, त्यानें तरी चढाईच्या धोरणाचे बाळकडू कॉंट्रॅक्टरला पाजले पाहिजे. हजारेंची मानसिक बैठकच अगदीं धामी, संथ, साहस न पत्करणारी आहे. त्याचेच प्रत्यंतर त्यांच्या धीम्या, अनाक्रमक फलंदाजींत आपणांस दिसून आले. त्यांची नेतृत्त्वांतही बचनात्मक वृत्तीच अधिक्याने नजरेत आली. आता निवडींतही हजारे हे तेंच धोरण—तोच संरक्षणात्मक दृष्टिकोन ठेवू पाहात आहेत. यंदाच्या टेस्टमालिकेला वेगळे महत्त्व असलें तरी बचावात्मक पद्धतीचे फलंदाज संघांत कोंबून आपण कुठवर जाणार आहोंत ? प्रतिपक्ष सरस नसतांना नवे प्रयोग करणे धोक्याचे ठरत नसते.तरी यापुढे हजारे यांनीं नव्या रक्ताची, नव्या दमाची तरुण मंडळी संघांत घ्यावी. धडाडी दाखविणारे फलंदाज जर संघांत असतील तरच आतां भारतीय क्रिकेटला विजयाचा प्रकाश लाभणार आहे !

मुंबईला कॉंट्रॅक्टरने पहिल्या दिवशीं गोलंदाजींत अनाक्रमक धोरण ठेवले होतें, ते खासच योग्य नव्हतें. धावा दाबून ठेवायच्या एवढाच त्याचा उद्देश स्पष्ट दिसत होता. नाडकर्णी किंवा उम्रीगर यापैकीं एकजण सतत कुठल्यातरी एका बाजूनें चेंडूफेक करीत होता. त्यामुळें धांवा दबल्या, खेळ कंटाळवाणा झाला आणि विकेटस् पडल्या नाहींत त्या नाहींच. पुढे मात्र त्याने जेव्हां एका बाजूने स्पीनचा मारा व दुसऱ्या बाजूने गतीचा मारा चालू ठेवला तेव्हां गुगली व बंपर या परस्परविरोधी चेंडुफेकींत फलंदाज गारद झाले व पाकचा संघ झपाट्यांत गडगडला. हा पवित्रा आपण आखला पाहिजे. कानपूरलाही कॉन्ट्रॅक्टरनें नाडकर्णी व उम्रीगर यांना फार गोलंदाजी करायला लावलें. गुप्ते, मुद्दया, देसाई व बोर्डे यांचा त्या मानाने त्याने कमी उपयोग करून घेतला. नुसते धांवा दाबून ठेवणे हे आपले ध्येय असू नये, विकेटस् घेणे हे आपले ध्येय असावें. तसेंच नुसताच पहिल्या डावावर विजय मिळवायचा व सामना वाचवायचा ही आपली दृष्टि असूं नये. जलद धांवा काढून निर्णायक यश पदरांत पाडायचे व सामना जिंकायचा ही आपली दृष्टि असावी. या दृष्टीनें नरीनें यापुढे पाऊल उचलले पाहिजे.

नरी अजून तरणा आहे. त्याच्या नेतृत्वांत सुधारणेला वाव आहे हे मात्र त्याने मुंबईला दाखवून दिलें आहे. अधिकारींचे, उम्रीगरचे उत्तम मार्गदर्शन त्याला लाभावे अशी कोणीही अपेक्षा करील. त्यामुळें तो सुधारू शकेल. मात्र नरीला पुढील टेस्टसाठी नियुक्ती झाली हें ठीकच झाले आहे.

नरी अजून पंधरा टेस्टस् तरी कमीतकमी निश्चित खेळेल. त्यामुळे पुढील पधरा टेस्टमध्यें त्याचेच नेतृत्व स्थिरावल्यास भावी संघास ते फायदेशीरच ठरेल. आजपर्यंत आपणाकडे ओळीनें १५–२० टेस्टमध्यें नेतृत्व करणारा कप्तान कधींच झाला नाहीं. नरीच्या बाबतींत सातत्य टिकल्यास ती भारतीय क्रिकेटमध्यें एक क्रांतीच ठरेल ! वस्तुतः पाक गोलंदाजी तितकी प्रभावी नाहीं. त्यांत ट्रूमन, गिलक्रिस्ट, हॉल मेक्किफ यांचा वेग नाहीं; डेव्हिडसन् स्टेथमची अचूकता नाहीं; वेनॉ, रामधीन वगैरेंचा फसवेपणाही नाहीं. असे असतांना आमचे फलंदाज इतके संथ कां खेळावेत हे कळूं शकत नाहीं. मुंबईचे विकेट तर फलंदाजाला अनुकूल होतें. त्यावर गवत कमी होते. त्यामुळें चेंडू वेगानें येत नव्हते व वळतही नव्हते. कानपूरच्या विकेटवरही गती व फिरक गोलंदाजांना मिळतच नव्हती. तेही विकेट गोलंदाजांना फारशी मदत करीतच नव्हते. त्यांत परत मुंबईला फाजल नव्हता व कानपूरला फरुक नव्हता. तरीही केवळ घनी, हुसेन व हसीबच्या सरळ चेंडूंना सरळ

## हें चित्र पहा

सन १८९९ सालची गोष्ट. ओव्हल मैदानावर सरे वि. सॉमरसेट असा महत्त्वाचा सामना खेळला जात होता. सरे संघाचा सलामीचा फलंदाज ॲबेल हा खेळावयास आला व शेवटपर्यंत नाबाद राहिला. त्यावेळीं सरे संघाच्या ८११ धांवा झाल्या व ॲबेलनें स्वतः ३५७ धांवा केल्या. आघाडीच्या फलंदाजामध्यें ॲबेलचा हा क्रम अद्वितीय आहे.



## आणि हें चित्र पहा

सन १८५२ सालची गोष्ट. त्रिनिदाद येथें एका सामन्यांत एक मजेदार घटना घडली. पहिला गेलेला एक फलंदाज शेवटपर्यंत खेळून नाबाद राहिला आणि शेवटपर्यंत खेळून त्यानें किती धांवा जमवल्या असतील ! २०० ? १५० ? २०० ?—अं हं. त्यानं शेवटपर्यंत एकहि धांव मिळविली नाहीं. भोपळा न फोडतांच तो नाबाद राहून परत आला.





अनुक्रमणिका

बॅटींनीं अडविण्यापलिकडे आमच्या फलंदाजांनीं विशेष कांहींच केलें नाहीं. विशेषतः तिकडे ऑस्ट्रेलियांत वेस्टइंडिज व ऑस्ट्रेलियन् फलंदाजांनीं जी उत्तुंग भरारी मारली ती भारतीय फलंदाजांना स्फूर्तिदायक वाटूं नये याचें अधिक नवल वाटतें. तिकडे जी लढाऊवृत्ति, चुरस दिसली तशी भारत–पाक संघांत दिसलीच नाहीं !

हनिफ, सैद बाद झाल्यानंतर सामना वाचवायचा हीच पाकची वृत्ति आणि पाकच्या ३५० व ३३५ धांवांना डोंगर समजण्याची व मौनसिक दडपणाखालीं खेळण्याची आमची वृत्ति ! दोन्ही संघांची मानसिक बैठकच ही अशी. मुंबई–कानपूरच्या अनिर्णितावस्थेचें हे खरें कारण आहे !

आमचेकडे रोज फक्त ४। तासाचाच खेळ होतो. हें थांबायला नको कां ? कमींत कमी रोज ५॥ तासांचा खेळ नको कां ? आणि त्यांत निदान ३०० धांवा व्हायला नकोत कां ? सध्यां आमचेकडे दिवसाला १४९ धांवाच होतात. हें ठीक आहे ? पूर्वी आपण म्हणत होतो कीं भारतानें दुसरा डाव अगोदर खेळावा ! तसेंच आतां होत नाहीं कां ? त्याचप्रमाणें पाक खेळाडूंचा अखिलाडूपणा। पाक कप्तानाच्या विकेटवरील येरझाऱ्या, भारतीय पंचाबद्दल त्यांनीं काढलेले कडघट उद्गार यांनीं सामन्याला मिळत चाललेले भलतेच वळण थांबायला नको का ? हा सारा कंटाळवाणा, कडवट प्रकार कोणाला नको आहे. आम्हांला पाहिजे आहे खेळीमेळीची चुरस—आकर्षक खेळ, जलद धांवा आणि सामन्यांतील निर्णायक विजय !

● ●

[ पान ५५ वरून चालू ]

अटीतटीनें लढवल्या गेलेल्या या सामन्यांत कांहीं विक्रमहि अभावितपणें प्रस्थापित झाले.

सोबर्सने या सामन्यांत १२५ मिनिटांत शतक पुरें केलें. व शिवाय तीन हजार धांवांची मर्यादाहि गांठली. ओनीलनेहि ऑस्ट्रेलियांतील कसोटी सामन्यांतील पहिलें शतक पुरें केलें. डेविडसन् या सामन्यांत खूप गाजला. त्याची गोलंदाजी व फलंदाजी यानेंच ऑस्ट्रेलियाला वांचविलें असें म्हटलें पाहिजे. २२२ धांवांत ११ बळी हा त्याचा विक्रम आहे. दुसऱ्या डावांत फक्त ९२ धांवा झाल्या असतां ऑस्ट्रेलियाचे ६ गडी बाद झाले होते. अशा वेळीं कर्णधार बेनॉ याला 'कानपूरची' आठवण होऊन छातींत धडकी भरली असल्यास आश्चर्य नसावें; पण ह्या बहादुर गड्यानें, डेव्हिसन्च्या मदतीनें धडाडीचा प्रयत्न केला, व ऑस्ट्रेलियाचें थोरपण पुन्हां एकदां सिद्ध केलें. बेनॉप्रमाणेंच वॅरेलची देखील पाठ थोपटली पाहिजे. फलंदाज या नात्यानें दोन्ही डावांत त्यानें आपल्या संघाची पडती बाजू सांवरली. व खेळांतल्या डावपेचांतहि आपण बेनॉच्या बरोबरीचे आहोंत हें सिद्ध केलें. क्रिडांगणावर कृतांतासारखा भासणारा वेस्ले हॉलनें तर ६३ धांवांत ५ बळी घेऊन आस्ट्रेलियाचा कणा मोडून त्यांच्या फलंदाजांना विचारांत ठेवलें.

या सामन्यानें कुर्मगति फलंदाजांपुढें एक वेगळाच आदर्श ठेवलेला आहे. वेळीं-अवेळीं बचावाच्या धोरणाखालीं टुकू–टुकू खेळून प्रेक्षकांना आंबवणें हेंच केवळ क्रिकेट खेळणें नव्हे हेंहि या सामन्यानें सिद्ध केलेलें आहे.

● ● ●

---

आतांच कांहीं दिसलें का ? "

" हो दोन राजकुमार घोड्यांवरून दौडत जातांना पाहिले ! "

" तेच राम-लक्ष्मण होते. " मारुतीराय उत्तरले, व अदृश्य झाले.

आपल्याला रामदर्शन झालें; पण तें अपुरें झालें या विचारानें स्वामींची विषण्णता अधिक वाढली. त्याच चिंतेंत असतांना एकदां चित्रकुटाच्या घाटावर प्रभूंच्या पूजेसाठीं चंदन उगाळीत बसले होते. एक अत्यंत सुंदर हात चंदन मागूं लागला. स्वामींनीं मान वर करून पाहिलें. प्रभु रामचन्द्र स्वामींच्याजवळ उभे होते. स्वामी मुग्ध झाले. त्यांची शुद्धबुद्ध हरपली. आयुष्याचें सार्थक झालें.

गोस्वामींना आतां पंचाहत्तर वर्षें पूर्ण झालीं होतीं. त्या वर्षीच्या रामनवमीला स्वामी मतस्थ होते. इतक्यांत मारुतीराय प्रगट झाले व आज्ञा केली, " रामचरित्र लिहा. " स्वामींनी ती शिरसावंद्य मानून तावडतोब सुरुवात केली. दोन वर्षें, सात महिने, सव्वीस दिवसांनीं स्वामीजींनीं 'राम चरित मानस' हा अमर ग्रंथ लिहिला. तो पुरा झाल्यावर मारुतिरायांनीं संपूर्ण ऐकला व आशीर्वाद दिला, " तुमची ही कृति तुमच्या नांवाबरोबर अमर राहील ! "

आतां सिद्धि प्राप्त झाली होती. तिच्या प्रभावानें शक्ति प्राप्त झाली. स्वामीजींच्या हातून चमत्कार घडूं लागले. एका विधवेचा पति आशीर्वादानें जिवंत झाला.

बादशहांच्या कानावर ही गोष्ट गेली. बादशहांनीं बोलावलें. भर दरबारांत सांगितलें, " कांहीं चमत्कार दाखवा ! "

" रामनामाव्यतिरिक्त मी चमत्कार जाणत नाहीं. " स्वामीजी उत्तरले.

" जोंपर्यंत चमत्कार दाखविणार नाहीं; तोंपर्यंत कैदखान्यांत ठेवण्यांत यावें. " बादशहाने हुकूम केला, तुलसीदासांनी हनुमंताची स्तुति केली. भलें मोठें वानरदळ एकदम राज्यांत प्रगटलें. आणि त्यांनीं विध्वंस करायला सुरुवात केली. सारी प्रजा हवालदिल झाली. शेवटीं राजवाड्यापर्यंत झळ पोंचली तेव्हां बादशहानें तुलसीदासांचे चरण धरून क्षमा मागितली.

* * * *

तुलसीदासांचे बारा ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रामचरितमानस, कवित्त रामायण, रामलला नहछू, जानकीमंगल, बखैरामायण, पार्वतिमंगल, विनय–पत्रिका, इत्यादि, परंतु स्वामीजींचा अतिप्रसिद्ध ग्रंथ, म्हणजे रामचरितमानस. घरोघरीं त्याची पूजा केली जाते. भक्तिभावानें त्याचें पठण केलें जातें. मुमुक्षूंना मोक्षप्राप्ति करून देणारा, दैन्य दूर करणारा व भगवद्भक्तांना भगवंताचें दर्शन घडवणारा असा हा तारक ग्रंथ आहे.

वयाच्या १२६ व्या वर्षी गोस्वामी साकेत लोकांत विलीन झाले.

" संवत सोलह सै असी, असी गंगके तीर ।
श्रावण शुक्ला सप्तमी, तुलसी त्यज्यो शरीर ॥ "

— गोपालकृष्ण भोबे

हें मासिक मालक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथे दलाल आर्ट स्टुडिओ, ७०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




